# कस्तुरीपक्षी

## (काल्पनिक दीर्घकथा)


**शुभांगी पासेबंद**

९८६९००४७१२

scpaseband@gmail.com



या पुस्तकातील लेखनाचे सर्व हक्क लेखिकेकडे सुरक्षित असून पुस्तकाचे किंवा त्यातील अंशाचे पुनर्मुद्रण वा नाट्य, चित्रपट किंवा इतर रुपांतर करण्यासाठी लेखिकेची परवानगी घेणे आवश्यक आहे. तसे न केल्यास कायदेशीर कारवाई होऊ शकते.

# प्रस्तावना

आदिवासींचे समज गैरसमज यात वावरुन, त्रास सोसून, आपले संशोधन चिकाटीने पूर्ण करणाऱ्या एका साध्या बाईची ही गोष्ट तुम्हाला नक्की आवडेल, गोष्ट वाचून सोडून देऊ नका.

सावधान!

ही वेळ, असे संघर्षाचे प्रसंग तुमच्यावरही येऊ शकतात. तुम्ही इतरांना बळ द्या, ते तुमचे नैतिक बळ ठरेल.

दुर्मिळ गोष्टी अमूल्य असतात, तर सामान्य गोष्टी प्रातिनिधिक असतात. ही काल्पनिक गोष्ट कुणाचीही सत्यकथा, जीवनगोष्ट होऊ शकते.

★

# मनोगत

निसर्ग व मानव यांच्या सहजीवनाचे वर्णन आपण ऐकतो पण ते समान्तर असते हे पटते का ? मग वाचा म्हणजे पटेल, कस्तुरी पक्षी हे तर नष्ट होणाऱ्या सद्‌गुणी माणसांचे रुपक आहे.

या कादंबरीतील सर्व नांवे, स्थळे व घटना पूर्णतः काल्पनिक असून त्यांचे कोणाशीही साम्य आढळल्यास तो निव्वळ योगायोग मानावा.

# अर्पणपत्रिका

हे पुस्तक मी डॉक्टर सलीम अली आणि हो वाचक हो, तुम्हालाच अर्पण करते.

शुभांगी पासेबंद
९८६९००४७१२

कस्तुरीपक्षी हा एक क्वचितच दिसणारा व नष्ट होण्याच्या मार्गावरचा पक्षी आहे. खरेतर पक्षी म्हणजे काय? एक सजीव, ज्याला दोन डोळे दोन पंख (दोन हातांऐवजी) दोन पाय, पोट असते. पक्ष्यांचे खास म्हणजे त्यांना चोच असते, पंख असतात व ते उडू शकतात. माणसाला हेवा वाटावा असे हे पक्ष्यांचे उडणे महत्त्वाचे असते. त्यांना गाडी पकडणे, ट्रॅफिक जॅमचा त्रास नाही. पक्ष्यांचे दुसरे खास वैशिष्ट्य म्हणजे त्यांचे आकर्षक रंगाचे पंख! या पंखावर जी पिसे असतात त्यांचे रंग व रंगसंगती पाहून तुम्ही म्हणाल –

ये कौन चित्रकार है ये कौन चित्रकार?

लहान मुलाने रंगपेटीतील रंगाचे वाटेल तसे शिंतोडे टाकावे, रंग फेकावे, तरीही ते सुंदर दिसावे, असे रंगीबेरंगी पक्षी खूपच आनंद देतात. त्यांची शीळ व किलबिलाट श्रवणीय असतो. हिरव्या नोटांच्या, सिमेंटच्या जंगलात नोकरीस जायला निघाले की मला कोणता ना कोणता पक्षी शीळ घालून बोलावू लागतो. ज्या दिशेने शीळ ऐकू येईल तिथून शोध घेत मान वळवून मी त्या पक्ष्याचा शोध घेत असे. आता तर कस्तुरी वेड लागले होते.

त्या आदिवासी गावात बदली झाली तेव्हा निळे डोंगर, हिरवी झाडी, गुलाबी फुले व रंगीत पक्षी यांची स्वप्ने बघून मन अत्तर अत्तर झाले होते. गावातील एक बेबीबाई नावाची ९० वर्षीय वृद्धा एका कामानिमित्त भेटली. तिचे शेत, डोंगराच्या पायथ्याशी व जलाशयाच्या पलिकडे होते. तिला भेटले.

‘‘पक्षी येतात का शेतात ?’’ –मी

‘‘हो फौजच असते. पाणी पिऊन हुषार (तरतरीत) झाले की झाडांवर बसून गात राहत्यात. शीळ घालतात.’’ बेबीबाई

‘‘काही वेगळे पक्षी ? उदाहरणार्थ कस्तुरी राजा पक्षी येतो का ?’’ मी

‘‘बया!बया! माझ्या लहानपणी माझे आजोबा मला सांगत की त्या हिरव्या रानी, वरच्या अंगाला, आंब्याच्या झाडावर कस्तुरीराजा पक्षी येतो. कस्तुरी राणी अंडी घालते. जर त्या पक्ष्याला त्रास झाला तर तो जमीनीत डोके घालून मरुन पडतो.’’

‘‘मला दाखवाल ती जागा ? मी बोलू शकते पक्ष्यांशी’’ – मी

‘‘व्हय, नेईन की बाल्ये (बेटा) पण बघ कस्तुरी पक्ष्याची अंडी व घरटे बघणे आम्ही वंगाळ, अशुभ मानतो. पूर्वी सुद्धा काही लोक भरतपूर नावाच्या गावाहून आले होते. शेतावर राहीले अभ्यास केला.’’

‘‘मला पण अभ्यास करायचा आहे, कस्तुरी पक्ष्याबद्दल’’ -मी

‘‘नोकरी वेगळी आणि हे पक्ष्यांचे वेड ?’’ - बेबी आजी म्हणाली

‘‘आजी थ्री ईडियटस् पाहिला ना! पोटासाठी कोण काय करतो आणि त्याचा छंद काय असतो’’ – मी

‘‘हो बघितलाय की’’ – आजी. आजीने मला तिचे शेत दाखवले. गाव दाखवला. गावात पाणी नव्हते. वीज अर्धा वेळ गायब असे. मात्र सिनेमाचे व्हिडीओ थिएटर होते, मोबाईल्स होते. पायात चप्पल नसलेले, चष्म्याच्या काचा फुटून कसे तरी, विरुप झालेले ते चष्मे वापरणारे, अर्धपोटी लोक सुद्धा चित्रपट, दूरदर्शन मालिकांचे वेडे झाले होते. हिरवी झाडी व पक्षी होते. पण जलाशय सुकत चालला होता. तिचा झील म्हणाला,

‘‘शंभर वर्षांपूर्वी इथे कस्तुरीपक्षी येत असे म्हणूनच या गावाचे नाव कस्तुरबे पडले होते.’’ तुम्ही येत जा,म्या येईन तुझ्याबरोबर तो पक्षी शोधायला.’’ आज्येचा तरुण नातू म्हणाला.

घरात कासवांच्या टणक पाठी, शंख, जनावरांची हाडे होती. बैलाची शिंगे होती.

‘‘तुम्हाला कासवाची पाठ हवी का ?’’ झील. दारावर पाटी होती कस्तुरी फार्म!

‘‘नको, मला आवडत नाही.’’ – मी

मी तिथून घरी आले, पण मला त्या कस्तुरी पक्ष्याचे वेड लागले होते.

१९७८ साली नूतन व परिक्षित सहानी यांचा कस्तुरी नावाचा चित्रपट पाहिला होता. पण आता आठवत नव्हते. १९८४ साली मी रिसर्चसाठी कस्तुरीपक्षी हा विषय निवडला होता. मात्र आई वारली, नोकरी पकडली ती करतच राहिले. काही जुनी कागदपत्र व नोट्स होत्या. पण त्या शोधायला हव्या. कस्तुरीमृगाचे आकर्षण सर्वांनाच असते. मात्र कस्तुरीपक्षी फारसा कुणाला ओळखीचा नाही. काही जणांनी तर कस्तुरी पक्षी असतो ह्याबद्दलच मला वेडात काढले. नागराजन

नावाचे माझे तेव्हाचे पी.एच.डी.चे गाईड होते, त्यांना मेल टाकला आणि नोट्स शोधायला सुरुवात केली.

कस्तुरीपक्ष्यांचे तीन प्रकार आहेत. इंडोनेशियात साधारणपणे हे पक्षी सापडतात. हा पक्षी जवळजवळ नष्टच होण्याच्या मार्गावर आहे. अलिबागच्या पुढे डॉ. सलीम अली, पक्षीतज्ञ यांची सासुरवाडी आहे. त्या पट्ट्यांत अनेक पक्षी आढळतात. तिथे एखादे दोन कस्तुरी पक्षी असू शकतात.

पाच प्रकारचे कस्तुरी पक्षी, त्यांची नावे आणि चित्रे आज २८ वर्षांनंतरही आठवतात. कस्तुरीपक्षी कुठे दूर थोडीच होता. माझ्या प्रोजेक्टच्या वहीत माझी वाट बघत होता. जसे आपण एखाद्या व्यक्तिची घटनेची वाट बघतो, तशी ती घटनासुद्धा घडायला आतुर असतेच की ? ते सुद्धा त्या इतरांचेही त्या घटनेचे नशीब असते.

कस्तुरी पक्ष्यांचे पाच प्रकार असतात.

१. कस्तुरी केपला हित - रंगी बेरंगी

२. कस्तुरी राजा - लाल

३. कस्तुरी सुलावेसी - रंगीबेरंगी

४. कस्तुरी टेंगुकुंगु - कबुतरासारखा

५. कस्तुरी टर्नेट - तीन पानांप्रमाणे

कबुतर, पोपट अशाच आकारांचा व रंगीबेरंगी कस्तुरीपक्षी नावडता असतो. आदिवासींचे कस्तुरी पक्ष्यांबद्दल वेगवेगळे समज व गैरसमज आहेत. कस्तुरी पक्ष्याबद्दलचे संशोधन फारसे यशस्वी होत नाही. पक्षीमित्र संघटना जर कस्तुरी पक्षी दिसला की १२० वर्षे जुना पक्षी पुन्हा दिसला असते सांगतात. त्या पक्ष्यांचे फोटोसुद्धा फारसे स्पष्ट येत नाहीत. कारण तो एका जागी स्थिर राहत नाही, सारखा हालचाल करतो. शिवाय त्या काळी असे खास विकसित कॅमेरे नव्हते. शिवाय त्या पक्ष्याला इतर पक्षी टोचून ठार मारतात अशी आख्यायिका आहे.

दुसऱ्या दिवशी काम आटोपल्यावर बेबीबाईच्या घरी पोहोचले तेव्हा ती झोपडी बाहेर, काथ्याच्या खाटेवर बसली होती. बाजूला मोहाच्या फुलाची दारू बनवण्याच्या प्रयोगाकडे मी दुर्लक्ष केले. अंगभर वस्त्र नाही, लंगोटी गुंडाळलेले हे पुरुष व जेमतेम टॉवेल बांधलेल्या स्त्रिया बघून वाटले या देशाची प्रगती ही खरोखरच दुभंग आहे. प्रगती व विकास या लोकांपर्यंत पोहोचलाच नाहीय. शहरापासून ४० किमी वर इतकी अप्रगत जमात राहात होती. सूर्यास्त होत आल्याने पक्षी किलबिलाट करीत होते. वेगवेगळ्या झाडांवर तऱ्हेतऱ्हेची घरे-घरटी होती. आपण शहरी लोक सुगरण पक्ष्याच्या घरट्याशिवाय दुसरे घरटे आपल्याला माहितीच नसते.

पाय वाटेने चाललो होतो. बेबीबाईने हातात वेडीवाकडी काठी घेतली होती व ती माझ्या पुढे तुरुतुरु चालत होती. पायवाट संपली, समोर जलाशय होता. कस्तुरबे गावात खूप जलाशय आहेत. जलाशयाच्या पुढे एक जंगल होते. पाने काळपट असलेली झाडे, सैनिकांसारखी उभी होती. त्यातील एका झाडापाशी बेबीबाईने मला थांबवले व म्हणाली, याच त्या झाडावर माझ्या आजोबाला कस्तुरी राणी पक्षीण दिसली होती. ते झाड खूप उंच होते. झाडाचा बुंधा वीस फूट रुंद

होता. झाडावर अनेक पक्ष्यांची घरटी होती. जणू वसाहतच होती. झाडावरून पाण्याचे थेंब पडत होते. मात्र ते थेंब पाण्याचे नव्हे तर किटकांच्या विष्टेचे होते. ते एक झाड, पक्षी संस्थान होते.

झाडाकडे बघत असतानाच तिथल्या एका घरट्यातून एक मुठीएवढा लहान रंगीबेरंगी पक्षी पंख फडफडवत दूर उडून गेला. तो कस्तुरीपक्षी असावा ?

''विष्ठेची घाण वाटली काय ? मग कसा दिसेल कस्तुरी राजा ?'' – आजी

''हात काळे केल्याशिवाय मडके बनत नाही.''

घाणीत फिरल्याशिवाय पक्षी दिसत नाही.

''शहीद झाल्याशिवाय झाशीची राणी बनत नाही'' – बेबीआजी म्हणाली.

त्या झाडाखाली आम्ही बसलो. बेबीआजी अनुभवाच्या शाळेत शिकली होती. ''ह्या झाडावर पूर्वी घरटे होते पण आता कस्तुरी राणी लांबवरच्या झाडांवर रहायला गेली आहे.'' आजी म्हणाली. आम्ही बसून हुश्शहाश्श करेपर्यंत दुसरा झील आला. तोच पलिता घेऊन आजीचा बाब्या आला व म्हणाला ''चला परत, उद्या उजेडाचे या, नाही तर पहाटेच या''

''नाहीतर तिला एकटेच येऊ दे'' झील म्हणाला.

''मला रस्ता सापडेल का उद्या ?'' मी विचारले.

''मी येईन तुमच्यासंग'' झील नाईलाजाने म्हणाला.

त्या घरट्यांचे झाडांचे फोटो काढून आम्ही परत निघालो. एक गूढ शांतता जंगलात होती. जंगलातील काही आदिवासी माझ्याबद्दल चर्चा करत असत, असे मला बेबीबाई म्हणाली. मी एकटीने जाऊ नये हेही तिने सुचवले. वाटेत फुलपाखरांनी लगडलेले एक झाड होते, रातकिडे गात होते, घुबड ओरडत होते.

रात्र झाली होती. बेबीबाईच्या झोपडीपासून रिक्षास्टँड वर पोहोचले. जंगलात वाटत नव्हती तेवढी भिती शहरी श्वापदांची वाटू लागली. दारुची दुकाने, बार्स, चायनीज गाड्या, रस्त्याच्या बाजुला उभ्या असणाऱ्या काही तशा 'स्त्रिया' बघून मला माझ्या धाडसाची भिती वाटू लागली. उद्या जर काही वाईट घडले तर ''मीही त्यातलीच'' असाही आरोप यायचा. खोटे आरोप यायचे ग्रहच असावेत बहुतेक!

दुसरा दिवस ऑफिसच्या कामातच गेला. पैशासाठी भांडणारे ग्राहक, विचित्र गावकरी, अनधिकृत झोपड्या, कर्जबुडवे, त्यांचा उद्धटपणा यामुळे दोन दिवस जाऊच शकले नाही.

एका आठवड्याने पाऊस सुरू झाला. रिपरिपीत गावी कस्तुरब्याला पोहोचणे मुश्किल तर पुढे कसे जायचे?

पाऊस कमी झाल्यावर पंधरा दिवसांनी गाडी व ड्रायव्हर घेऊन गेले. पण बेबीबाईच्या घरासमोर पणती तेवत होती. बेबीबाई एका रात्री झोपेतच गेली होती.

''तुम्ही कस्तुरीपक्षी शोधायला तिला नेले त्यामुळे अशुभ झाले'' झील म्हणाला.

''बेबीबाई गेल्या वाईट झाले. पण तुम्ही मला त्या पक्ष्यापर्यंत न्याल ?'' मी

''पुन्हा तुम्ही या वस्तीवर येऊ नका. कस्तुरीपक्षी दाखवला तर आमची अख्खी वस्ती नष्ट होईल. तुम्ही निघा'' – झील म्हणाला.

मला कस्तुरी पक्षी भेटलाच नाही.

''मयतासाठी दोन हजार लागले, तुम्ही पैसे द्या'' – झील

''मी माझ्याजवळ होते तेवढे पैसे दिले. मी तरी कुठे करोडपती होते. केवळ नाईलाजानेच तर ही नोकरी पोटासाठी करत होते, पोटापुरते कमवत होते. गाडी आणली होती व ड्रायव्हर सोबत होता हे बरे झाले.

ड्रायव्हर गाडीत म्हणाला – ''बाई परत या रस्त्याला येऊ नका. कस्तुरबे गावच विचित्र आहे. त्यात इथे आडवस्तीत सुरक्षित नाही.''

रंगपेटीतील रंगाचे ... कोलाज असावे असा तो कस्तुरी पक्षी नजरेसमोरुन हालत नव्हता. देवाने नक्कीच त्या कस्तुरीला आरामात, फुरसतीत बनवले असेल.रातकिड्यांची किरकीर, हलणारी पाने, पटकन उडणारा एखादा पक्षी व अंधार! रिसर्च म्हणजे पुन्हा शोधणे. जगात ज्याप्रमाणे यीनयान, स्त्री-पुरुष, पाणी-माती-आग, अंधार-प्रकाश हे विरोधी घटक संतुलित होतात तसे पक्षी व जनावरे व मानवसुद्धा होत असावेत. माझीही क्रेझी क्रिएटीव्हीटी असावी. बगळ्यांची माळ म्हणतात ती त्यांची मॅरेथॉन शर्यत असेल व पाणवठा ही शाळा असेल.

मी ड्रायव्हरला म्हणाले, ‘‘तुम्ही बरोबर सोबत आहात मग काय भिती ?

‘‘नाही बाई मला जीव प्यारा आहे’ शिवाय तो पक्षी शोधणे अशुभ असतो. जसे घुबड दिसणे अशुभ असते ना तसेच’ ड्रायव्हर म्हणाला.

‘‘तरीही मी शोधणारच’’ मी चिडून बोलले. मी नादखुळी झाले होते.

‘चंद्रकिरणात बाहेर पडणारी त्यांची चंद्रकस्तुरी नावाची जातसुद्धा असते.’ ड्रायव्हर म्हणाला.

‘‘राजापूरला आहेत का ते पक्षी’’ – मी. तो नाही म्हणाला.

घरी जाताना खूप ट्रॅफिक होता. पनवेल रोडवर पुलावर थांबावे लागले. वर पूल खाली रेलवे व सभोवती बहावा तामणाची झाडे खूप फुलांनी लगडलेली होती. महाराष्ट्राचा सोनवृक्ष हा पण फुलतो मात्र जंगलात! मी जोरात गाऊ लागले. ड्रायव्हर आरशातून, माझ्याकडे टक लावून बघत होता.

‘‘जळो वैशाख वणवा, तरी फुलण्याचा छंद हवा’’ – मी

‘‘ह्या झाडांमध्ये किती पक्षी असतील. सकाळी बगळ्यांची शाळा भरलेली दिसतेच.’’ – मी

ड्रायव्हर म्हणाला, ‘‘कर्नाळ्याला लई पक्षी आहेत.’’

घर आले. झोपताना मी मनाला आदेश दिला, ‘‘सुसज्ज व्हा उडा चला.’’ कुणीही वाणीने ‘न’ बोलवला मनाला ऐकू येतो, तो पक्ष्यांच्या मनाचा आवाज असावा. गाणारे, शीळ घालणारे, किलकारी देणारे ते पक्षी मला बोलावू लागले. वेडे झाल्याशिवाय काहीही करणे शक्य नसते. कस्तुरीपक्षी नजरेसमोर दिसे. कस्तुरी पक्षी अशुभ असतो असे लोक म्हणतात. घरी नवरा म्हणाला ‘‘कस्तुरीवेडी’’ पण मीच कस्तुरीपक्षी झाले होते.

★★★

कस्तुरी शोधाची ही गोष्ट सुरू झाली तेव्हा मी कमकुवत बाई होतेच पण तरुणी नव्हते. तशी मी तीस वर्षे नोकरी केलेली समजूतदार वृद्ध स्त्री होते. सुवर्णपदक धारक होते. पदोन्नतीवर मी त्या शाखेत रुजु झाले.

सक्षम मी, हुषार मी असे मत तोपर्यंत तरी माझे स्वतःबद्दल होते. ७० पुरुषांमध्ये मी एकटीच स्त्री पास झाले होते. म्हणून मला ती कस्तुरबे शाखा दिली होती. रात्री घरी पोहोचता यावे एवढी माफक अपेक्षा असल्याने मी तिथे रुजु झाले. निसर्गरम्य रस्त्याने पुढे 'त्या' अस्वच्छ गावी शाखेत रस्ता जाई. शाखेत श्रम भरपूर असल्याने मी काम घरी सुद्धा सोबत घेऊन येत असे. मला शत्रू भरपूर होते. मात्र कामाच्या बाबत माझी तुलना कुणाबरोबर होत नाही. हे ते जाणून होते व मी सुद्धा स्वतःला सिद्ध करण्यासाठी धावत होते. सर्व पेन्डींग मी काढले.

शाखेमध्ये आम्ही ७ बायका होतो. तीन पुरुष होते पण दोघे स्वार्थी होते व कांडेशी वाईटपणा त्यांना नको होता व मॅनेजरने लढावे व आपण मजेत रहावे हीच त्यांची वृत्ती होती. त्या घरट्यात, सॉरी शाखेत, मोनाली नावाची लेखणीक होती. आतापर्यंत तिने पाच मॅनेजर बघितले होते. किंबहुना मॅनेजरला पळवून वाटेला लावले होते. रजा घेऊन अर्ज न देणे, तीन वाजता घरी पळून जाणे दिवसभर फोन करणे ह्या बाबत ती कुप्रसिद्ध होती. पण गोडगोड बोलून मित्र मैत्रिणी जमवून होती. आतापर्यंत कायम केंद्रीय कार्यालयातच तिने काम केले होते व कामात गती नव्हती की काम करण्याची इच्छा नव्हती. मात्र एक खास गोष्ट अशी की काम टाळायची हुशारी तिच्यात होती. सर्व स्वतःच्या तब्येतीत चाले. माझ्या सारखी धावपळ नाही, भाबडेपणाही नाही.

त्या शाखेतील अनेक ग्राहक एक साखळीचा धंदा चालवत असत व त्या शाखेवर त्यांच्यातील कांडे नावाच्या व्यक्तीचा वरचष्मा होता. श्री. कांडे म्हणजे एक तक्रारपेटी होती. स्वतः तक्रारी करणे, इतरांतर्फे करून देणे हे त्याचे छंद व धंदे होते. तो स्वतःबद्दल मी अण्णा .... यांच्या टीमचा लीडर असे जाहीरपणे सांगत असे, पण एक-दोन ट्रस्ट, दोन-तीन महिला बचत गट अशा मार्गाने सरकारी सबसिडी मिळवणे, मिळवून देणे हा त्यांचा उद्योग होतो. थोड्याशा पैशाचे आमीष दाखवून काहीजण त्यांच्या उद्योगांत सामील होत असत. तृतीय वर्गीय चेक जमा करणे अशीही त्याची एक साखळी होती. गहू रंग, लबाड घारे डोळे, जाड शरीर कपड्यांतून बाहेर पडेल असे सुटलेले पोट व लंपट नजर हे त्याचे वैशिष्ट्य होते. मोनाली त्याच्याबरोबर खूष असे. त्यामुळे तो वाटेल त्यावेळी काहीही काम घेऊन ऑफिसात येत असे व तासन्तास उठत नसे.

त्याला धंदे, काम फारसे नसावे. त्याचे माझ्या समोर बसून डोळ्यात डोळे घालून बघणे, मला अजिबात आवडत नसे. ऑफिसची वेळ संपल्यावर मुद्दाम ऑफिसमध्ये येऊन तो बायकांशी लाडेलाडे गप्पा मारत असे.

त्या दिवशी संध्याकाळी ६ वाजता कांडे शाखे आला. त्याच्याबरोबर त्यांची दोन गिऱ्हाईके होती. त्याला पैसे हवे होते. शाखेत भरपूर पैसे बॅलन्स होते. त्यामुळे माझी तिजोरी उघडण्याची इच्छा नव्हती. प्रो. वि.नावाचा जो पुरुष क्लार्क होता त्याने दार उघडले. तिजोरी उघडून पैसे दिले तोपर्यंत श्री कांडे व त्याचे क्लाएंट हावरट नजरेने तिजोरीकडे व आमच्या शरीराकडे हपापून बघत होते. परगावचे क्लाएंट जे चेक आणतात. त्यावर संध्याकाळी खूप उशिरा

अधिक कमिशन घेऊन रोकड देणे हा कांडेचा धंदा होता. थोड्या वेळाने कांडेचा टिल्लू मुलगा आला. त्याने आमच्या ऑफिसमधल्या महिलांचे त्यांच्या मोबाईलवर फोटो काढले.

प्रेवी काहीतरी आक्षेप घेईल असे वाटत होते पण —

''काय नाश्त्याची सोय करा आमची'' प्रेवी

''हो करतो की! मॅडम तुम्हीही चला'' कांडे

कांडेच्या पोराने एक वडापाव सुरुसेच्या हातात ठेवला. मला त्या सर्व प्रकाराची घृणा आली.

खरे तर संध्याकाळी उशीर झाला की त्या शाखेत मला कसेसेच वाटे. समोर चिंचेची झाडे, तलाव, तलावाच्या बाजूला स्मशान होते. रस्त्यावर लाईट नव्हते, वर्दळ नव्हती. मात्र बाजुला चायनीजच्या गाड्या लागल्या होत्या. बीअरच्या दुकानात झगझगीत लाईट होते व काही गिऱ्हाईके होती. मी गेट बंद करत होते, चिक्कार, खूप दमलेले होते.

कांडेबरोबरच्या कंपू होता. त्यातील एक गिऱ्हाईक हळूच म्हणाले, ''हीच नवी मॅनेजर का? आपल्या सांगण्याप्रमाणे नाचली नाही तर उचलू या एक दिवस.

दुसरा म्हणाला ''आवाज लई छान आहे, फोनवर तिच्याशीच बोलावे. बघ! मी तर सांगतो मी महत्त्वाचा गिऱ्हाईक आहे. खालच्यांशी बोलणार नाही. मॅनेजरशीच बोलायचे आहे.

‘‘दूरवर बेबीबाईच्या शेतापर्यंत भेटीला जाते.’’ तिसरा गिऱ्हाईक ‘‘उशिरापर्यंत बसवायला सांगू या कांडेला आणि उचलू या, अंगावरचे दागिने ५००००/- चे आहेत.’’

मी मुख्यगेट लावायची खटपट करत होते. प्रेवी कांडेच्या स्कूटरवर बसून, सुरू से त्याच्या टिल्लू पोराबरोबर बसून निघून गेला. सर्वजण मला एकटीला सोडून गेले. मोनाली तर अशी भानगड करायची असेल त्या दिवशी दुपारी तीनलाच पळते, कारण ती त्या साखळीतलीच एक आहे; मला ते झेपत नव्हते, दिवसभर रॉकेलचा वास, जनरेटरचा आवाज नकोसा वाटे. माझ्या गाडीच्या ड्रायव्हरने मदतीला यावे ही इच्छा होती पण तो दुरुनच बघत उभा होता. मी गेट लावेपर्यंत दमले व कशी बशी गाडीत बसले.

सद्हेतू व निती तत्त्वांना एक बायप्रॉडक्ट असतो. विरोध! जो मी कायमच सहन करते व केला. पोनी माझी एक मैत्रिण होती ती म्हणायची – ‘‘तत्त्वांचे काय लोणचे घालायचेय का?’’

मी– ‘‘इतक्या खालच्या थरावर जाऊ नये.’’

पोनी – ‘‘तू कोण ठरवणार? बाकीचे जायला तयार आहे आणि तू मात्र त्यांना खालचा थर म्हणून शत्रू निर्माण करते आहेस.’’

पोनी कायमच MMZO, ऑफिस अशीच राहून खूपच स्वार्थी झाली होती. ‘‘जगात जे सर्वत्र चालते तसेच वागावे नाही तर जीवन म्हणजे युद्ध भूमि होते.’’ पोनी

मी लांबे शाखेत असताना पोनी पूर्वी तिल्ले या शाखेत होती व तिने तिथे भरपूर कमाई केली होती.

त्या वेगळे चेक वेगळ्या नावांवर घेण्याच्या प्रक्रियेत सर्वांचेच कमिशन होते. त्यामुळे मी दगडांवरच डोके आपटत होते. पैशासाठी झुकणाऱ्यांच्या स्वार्थाच्या धगधगत्या शेगडीत माझी आहुती पडली होती. पण तरीही तसे न दाखवता संस्था पुढे जात होते. कमिशनचे चक्र पूर्ववत चालू होते.

ग्राहक सभेत ठाण्याच्या संस्थेचे पैकरांचा सत्कार होतो. हा सत्कार कांडेच्या हस्ते करण्यात आला.

कांडेने भाषण ठोकले. सर्व खूष झाले. आपल्या मॅनेजरला (मला) उचलण्याच्या धमक्या देणाऱ्याच्या हस्ते सत्कार स्वीकारून पैकर ग्रेट झाला? मी कामात मन रमवत होते. पण मला शत्रू वेडे करत. वरिष्ठांनी कसे वागायचे याचे काही नियम नाहीत का? कांडेला खरे तर मी ५ लाख कर्ज द्यायला सुद्धा नाही म्हटले. दुसऱ्याचे गोडाऊन तिसराच दाखवतो. पैकरसारखे मूर्ख खूश होतात आणि १५ लाख मंजूर करतात व त्याच्या कडून सत्कार स्वीकारतात? ते मूर्ख म्हणून नव्हे तर ‘हरी पत्ती बोलती है’

धंद्याला नितीची जोड हवी की नाही?

शाखेत खाते उघडणे म्हणजे काय? मॅनेजरचा विनयभंग करण्याचा परवाना असतो का? इतकीही अब्रु, अक्कल नसलेले लोक वरच्या पदावर का व कसे जातात? असले गळके नळ

लावलेला हौद रिकामा न झाल्यासच नवल! कामानिमित्त पोनी माझ्या शाखेत आली त्यामुळे त्यादिवशी कस्तुरी फार्मवर जाता आले नाही. त्या कामात मला त्या कस्तुरी विचाराचाच विरंगुळा होता.

''पैकरची बायको RBI मध्ये आहे'' – पोनी

''तुला काय सुचवायचे आहे?'' – मी

''तू तिला काय सुचवायचे आहे ते समजून घेत नाहीस.'' – मोनाली

''तू त्याला विरोध करू नकोस. त्याच्याशी शत्रूत्व करून तूच बरबाद होशील'' – पोनी

''ही सूचना की धमकी? तू सुद्धा त्याच्याच बाजूची आहेस का पोनी?'' मी रोज सर्वांना गाडीतून नेत असे, पण त्या सोयीला कुणी जागणारे नव्हते. दुसऱ्या दिवशी मला घाबरवण्यासाठी सर्व चौकडी सांगू लागली.

''नंगे से खुदा भी ''डरे''म्हणतात.''प्रेवी.

''निदान खुदा ने तरी डरू नये.'' – मी

''पुढे काय घडणार याची उत्सुकता संपली. आता एकसुरी भांडणे'' मोनाली

सुरुसे म्हणाला, ''कांडेला निनावी तक्रारी करायचा छंद आहे.''

मोनाली म्हणाली, ''कशाला वाकड्यात शिरता. त्याच्याशी जुळवून घ्या. त्याच्या साखळीत सामील होऊ नका. पण विरोधसुद्धा करूच नका.'' सुरुसे व प्रेवीला कामच येत नसे व वेळ घालवत, रे मात्र काम चूकीचे का होईना पण करतो. चतूर मोनालीने झाशीच्या राणीलासुद्धा गोऱ्या साहेबासोबत नाते टिकवून खुषीमध्ये रहा असा सल्ला दिला असता. तिचे विचार-आचार तेच होते. त्यामुळे हजारो तक्रारी झाल्या तरी तिचे त्यांत कधीही नाव नसे. त्यामानाने मी साधी होते. मला गॉडफादर नव्हते व ऑफिसची नितीमत्ता डाऊटफुल होती. कांडेने शेवटचा बाण मारला. ''त्याने उघडपणे बलात्काराची धमकी दिली. शिवाय त्याने पोलीसात खोटी तक्रार दाखल केली. तर मी काहीबाही सांगितले, असेही खोटे अप्रत्यक्षपणे सांगितले.

सर्वांसोबत, पैकरला या साखळीतले परसेंटेज मिळत असे. पैकर म्हणाला, ''अशा साखळ्या सर्वत्रच असतात. तुम्ही त्या माणसाचा रोष ओढवून घेऊ नका, नाही तर मी पुढचे मेमो तुम्हाला देईन'' क्षेत्रिय कार्यालयाबद्दलचा आदर क्षणात संपला. त्यांच्या त्या साखळी चोरीला विरोध करते म्हणून कांडे गावगुंडांचा मोर्चा घेऊन पैकरकडे गेला, सोबतच्यांनी जी नावे सांगितली ती त्यांची होती की नाही याची खातरजमा न करता, त्यांच्या सह्या तपासून न पाहता पैकरने पुढचे चार्जशीट दिले. पैकरकडे सत्ता होती पण त्याची पैशाची भूक भागवण्यासाठी तो सत्ता वापरे. गैरव्यवहारात साथ न दिल्याने यूपी बिहारमध्ये कलेक्टर, तहसीलदार यांचे खून होतात असे वर्तमानपत्रात वाचले होते. महाराष्ट्र या स्पर्धेत मागे थोडाच आहे? त्यात पैकरसारखे बिकाऊ व नितीहीन असल्यावर ही स्पर्धा मी हरणार हे मला माहीतच होते. 'महाराष्ट्र बिहार'च्या बरोबरीनेच आहे. मात्र तक्रारी उघड होत नाहीत. माझ्याकडे सत्ता नाही हे वाईट नव्हते.

ज्यांच्याकडे सत्ता होती ते सत्तेचा दुरुपयोग करीत होते.

मला बलात्काराच्या धमक्या येऊ लागल्या. रोज कुणीतरी भांडण तमाशा करीत असे. कांडे त्याची वाईट नजर व ईरादे व्यक्त करू लागला. फसवणूकीच्या मार्गाने येणाऱ्या पैशांसाठी, कर्जांसाठी एक झुंड माझ्यावर दबाव आणू लागली. एका संध्याकाळी शाखा बंद करायच्या वेळी कांडे आला म्हणाला, ''हे बघा सवय नसली की या गोष्टींची भीती वाटते नंतर सवय होईल. १/२ पेग पोटात गेले की नितीमत्ता वगैरे सर्व विसर पडतो.''

या त्यांच्या क्रूर प्रपोजलने मी घाबरले. पण पैकर मग पुढे असेच फोनवर म्हणाला त्यामुळे मी खूप घाबरले.

समाजात इतरांच्या भांडणात कोणीच पडत नसते. पळूनच जाणे ते स्वीकारतात.

त्यानंतर कांडे वेळी अवेळी शाखेत येइल. मोबाईलवर मोठमोठ्याने व्हीआयपी लोकांशी बोलून मला घाबरवण्यासाठी वाटेल ते बोले.

मोनाली गालात हसून म्हणे,

दुनिया की निगाहों में भला क्या है बूरा क्या

ये बात अगर दिल से निकल जाये तो अच्छा

एका असहाय्य क्षणी मला समजले की पैकर स्वतःच त्या व्हिलन ग्रूपचा छुपा दादा होता. कोणाही इतर स्टाफचा OFFICE चा मला कुठलाही सपोर्ट मिळू शकत नव्हता. कारण

OFFICE चा पैकर व इतर त्यांना सामील होता. अशीही ज्याचे त्याचे प्रश्न ज्याने त्याने बघावे व आपण मजेत बसून घ्यावे अशीच वृत्ती असते व होती.

पैकर मला पूर्णपणे टेन्शनमध्ये ठेवून 'मी असुरक्षित आहे म्हणून मी त्या शाखेतून बाहेर पडावे म्हणून दबाव आणत होता. म्हणजे त्याची साखळी चालू राहील व त्याला त्याच्या मैत्रिणीला नीनाला त्या शाखेत आणता येईल. पैकर कामाने पीडलेल्या मला फोन करून ''मोनालीला गप्पा मारायला पाठव व उद्या On Duty असेसांगे. दोन वाजता Rm ची गाडी पैकर घेऊन येई व तिला फिरायला घेऊन जाई. मी उरलेले काम करत बसे.

पर्याय नव्हता. काटेरी मुकूट माझ्या डोक्यावर होता. लाईट नसत कनेक्टीव्हीटी सुद्धा नसे.''कमकुवत बाई, बिनताकतीची बाई'' म्हणून पैकर माझी हेटाळणी करीत होता. निती सांभाळणे खूप अवघड असते. महिलांनी बायकांनी एकदम खालच्या किंवा एकदम वरच्याच पदांवर काम करावे. मधल्या पदांमध्ये त्यांचे शोषण होण्याची शक्यता असते.

पैकर माझ्याबद्दल म्हणाला, ''दिसायला बरी आहे पण म्हातारी आहे.''

''तरुण वयात हाती आली असती तर ?'' हिडीस हातवारे करीत कांडे म्हणाला.

पैकर म्हणाला, ''तुम्ही माझे नाव कुठे आणू नका आणि तिच्या विरुद्धची मोहीम थांबवू नका. मी तुमच्या सोबत आहे.'' हे संभाषण अक्षिताने सांगितले. या संभाषणाची फित सज्जड पुरावा असूनही मी काय करू शकत होते ?

‘‘फुकट नोकरी जाईल तुमची, चेकरॅकेटमध्ये सामील व्हा, मी शेवटचे सांगतोय.’’ पैकरने मला दम भरला. ऑफिसातले ४ चमचे, दोन बायका साक्षीला उभ्या केल्या. नवल म्हणजे त्यासुद्धा स्त्री असूनही माझी परिस्थिती जाणूनही क्षूद्र फायद्यासाठी खिदळत होत्या. पोनी व पाटीली यांची उपस्थिती खोटे साक्षीदार रचण्यापुरती केली होती. कार्यालयाच्या भिंतीवर संस्थेच्या संस्थापकाचा फोटो अश्रू ढाळत होता.

कस्तुरीपक्षी बघितल्यामुळे अशुभ घडते, की माझे नशीब होते मला निश्चित सांगता येणार नाही, पण संकटाची मालिका सुरू झाली. रत्नागिरीच्या ऑफिसमध्ये मदत करणारे कोणी नव्हते. सत्तर एमएम सिनेमा अशी त्या शाखेवर टिका केली जाई.

मी OFFICE ला पैकरला भेटायला गेले. हिंदी दिवसाचा गाण्याचा समारंभ होता. पार्टीमध्ये चूर असलेले, इतर लोक फिशटँकमधील मासे, मला बघून खदखदा हसले. त्यातील एकजण दुसऱ्या पुंजाबीनीला – ‘‘मेरी चूड़ी देखो’’ दाखवत होती. दुसरी एक मुलाच्या नोट्स प्रिंट काढून (ऑफिसच्या संगणकावरून ऑफिसच्या A४ कागदांवर) ऑफिसच्या प्रिंटरने घेत होती. थोडक्यात कामचोरीत राष्ट्रीय एकात्मता होती.

पूर्व नियोजित भेटवेळ घेऊन मी नेहा जवळ बसले, ‘‘बॉस, साहेबांनी बोलावले होते.’’ – मी

‘‘मी बॉस नाही.’’ – ती

‘‘माझ्यावर अशी वेळ आली की गाढवाला पण साहेब, बॉस म्हणावे’’ - मी मनात

‘‘अगं देवापेक्षा दानव श्रेष्ठच असतात त्यांना खूष करावेच लागते’’ – पोनी

पोनी झाडावर कावळ्याने पिंडावर नजर ठेवावी तशी बसून बघत होती. नवीन मेमो नवीन चार्जशीट जे दिले ते घेऊन मी बाहेर पडले. युनियनला भेटणे, उत्तर लिहिणे पुन्हा सर्व दुष्टचक्र पुन्हा मागे लागले.

तेथील कर्मचाऱ्यांची मजा आणि हिंदी दिवसाची पार्टी होती पण मी बसून होते व पत्र घेऊन बाहेर पडले.

पत्राचे उत्तर घ्यायला पुन्हा जावेच लागले.

‘‘सर्वजण तुझ्याशीच का भांडतात. तुझा ॲप्रोच चुकतो का ?’’ रंगानी म्हणाली. एक पाटील नावाची बाई राजेशच्या पाठीत कळ आली म्हणून त्याची पाठ चोळत होती. भैय्ये फक्त फोन घेण्याचेच काम करत होता.

केबिनमध्ये पैकर कुचाळक्या करत बसला होता. ‘‘गाडीने तुम्ही शाखेत जाता, खर्च कसा परवडतो ?’’

त्याने विचारले.

‘‘सर, वय, तब्येत बघता गाडीने जाते म्हणून मी काम करू शकते. प्रवासात अर्धमेले झालेले यापूर्वीचे मॅनेजर काही खास करू शकले नाहीत, मला त्या शाखेत काही तरी करायचे आहे.’’ मी म्हणाले.

मला कस्तुरीपक्षी प्रोजेक्ट सोडायचे नव्हते.

‘‘नीनाला ती शाखा हवी आहे, तुम्ही बाहेर पडा तिथून, लिहून द्या मी धुंदलवाडीला जाते’’ – पैकर

‘‘नाही साहेब मी आहे तिथे ठीक आहे. बदलीच्या गावी प्रश्न नसतील असे थोडीच आहे.’’– मी

‘‘निघा तुम्ही त्या शाखेतून बाहेर! बदली स्वीकारा.’’ नाही तर पुढचे चार्जशीट देईन. तरुण बाई लवकरच देतो नीना देतो त्या शाखेत, आम्ही तिला मदतही देऊ.’’

बदली स्वीकारून मी नवागावला जावे का ?बलात्काराच्या टांगत्या तलवारी खाली मी किती काळ वावरणार ? त्या बाईला मदत देणार होते मग मला का नाही ? मी शत्रू होते ? की पैकरलाच माझ्यावर अत्याचार व्हावा ही इच्छा होती ?

माझ्या घरी नातेवाईकांना एकदम बुवाबाबांचा वायरस लागला होता. वाटेत कांडेची गाडी माझ्या मागे होती. तो पाठलागावरच असे. आम्ही आश्रमाच्या दिशेने निघालो.

कांडेसारखा क्षुद्र किडा ३४००० माणसांच्या संस्थेतील मॅनेजरला छळत होता. बहीणीबरोबर रामस्वरुप बाबांच्या आश्रमात पोहोचलो.

मला खरे तर गुरु, ज्योतिषी अशा व्यक्तींना भेटायला अजिबात आवडत नाही. चालत चालत थकून भागून आम्ही पोहोचलो. ‘‘गुरुजी आयुष्य म्हणजे काय ?’’ – मी

‘‘ते मलाच काय कुणाही तत्वज्ञाला अजूनपर्यंत कळले नाही’’ – गुरुजी

‘‘तेच ते परीघाभोवती फिरणे की बाहेर फेकले जाणे? विश्रांती, झोप, आराम, सुखसोयी की काय?’’ मी

‘‘सुपातले जात्यातल्यांना हसतात व पुन्हा जात्यातच जातात.’’ – गुरुजी

परीघातले परीघा बाहेरच्यांना हसतात तरीही स्वतःला ग्रेट समजूनही त्यांना इतरांवर जळावेसे वाटते.

विकार हे शत्रू असतात पण या संस्थेत निती हाच विकार आहे. – मी

‘‘ईर्षेमुळे माणूस कायम दुःखी होतो.’’ – गुरुजी

‘‘कायम तुलना करायची इतरांशी? माझी - मी - इतरांनी? ’’– मी

‘‘चांगल्या गोष्टींचे योग असतात. तू जशी त्या चांगल्या घटनेची वाट बघते तसे इतरही कुणीतरी तुझ्याबरोबर काम करण्याच्या योगाची वाट बघत असतीलच ना!’’ – गुरुजी

‘‘तो योग कधी येणार?’’ – मी

‘‘येईल! दहा महीने जुन्या कोंडवाड्यातून बाहेर पडायची वाट बघितलीस, नव्या पिंजऱ्यात शिरण्यासाठी काही दिवस वाट बघ.’’ - गुरुजी

‘वाट बघ’ सांगणे हा सोपा उपाय असतो किंवा ५० मंगळवार कर म्हणजे १२ महिने जातात. गुरुजींना नमस्कार करून मी बाहेर पडले.

हे गुरु लोक हुषार असतात. कुठलाही निर्णय देत नाहीत. अजून अजून गोंधळवून टाकतात.‘‘तुमचा निर्णय तुम्ही घ्या’’ हेच सांगतात. म्हणजे खरे तर पुढे काहीही झाले तरी जबाबदारी तुमचीच राहते.

असेही हे गुरु लोक, मनाप्रमाणे झाले नाही असे त्यांना सांगायला गेलो तर ‘‘श्रद्धा कमी पडली’’ असे म्हणतात.

आश्रमातून मी बाहेर पडले. लोकल, गाड्या भरून वहात होत्या. लोक हास्यविनोद करीत ऑल इज वेल दाखवत होते. कदाचित खरेच श्री. कांडे व त्याच्या सहकाऱ्यांना त्यांच्या बलात्कार, विनयभंगाच्या प्रयत्नात यश आले असते तरीही हे जग असेच चालणार होते. माझा प्रश्न आणि मी आम्ही त्या बाजूच्या वातावरणात जिरुन जाणे शक्य नव्हते. एवढी मोठी आकाशगंगा अनेक ताऱ्यांची बनते पण प्रत्येक ताऱ्याला त्याचे स्वतंत्र आयुष्य अस्तित्व जगावेच लागते. शिवाय प्रत्येक ग्रह निराळा आणि आपापल्याच कक्षा मार्गावर फिरणारा असतो. नोकरीतला संघर्षाचा व रिसर्चचा माझा मार्ग वेगळा होता, एकटीचा होता. संघर्षाचा होता. कारण स्वार्थी लोकांना मदत करायची इच्छा नव्हती. आश्रम तरी कुठे मदत करतात. फक्त भाषणे वरवरची मलमपट्टी होती.

वाट वळणावर थबकलेली

आभाळाचे रुप बिलोरी

तिच्या नजरेत जपून ठेवणारी

अज्ञाताची ओढ लावणारी

रित्या नदीच्या तीरावर तो आश्रम होता. आश्रमात समाधीचे तेज जाणवत होते. मी थोडा वेळ बसून ऑफिसला गेले. काही गोष्टी आपण विसरतो. पण काही गोष्टी त्यांना विसरता येत नाहीत. ते लोक सूड घ्यायचे ठरवूनच असतात.

सुट्टी 'न' घेतलेल्या तारखांबद्दल व पूर्वी अर्ज देवून मंजूर केल्या गेलेल्या सुट्ट्यांबद्दल कृष्णाने एक खोटे नाटे पत्र तयार केले. लांड्या लबाड्या करण्याच्या, त्याच्या या जुन्याच गुणाला, मोनालीने खतपाणी घातले. रजा घेऊन अर्ज न देणे हा तिचाच गुण होता. स्वतः कृष्णा किती वेळा फोन केल्यावर रजेवर असे मात्र डिसेंबरमध्ये रजा बुडते म्हणून २ महीने सुट्टीवर जाई. लागून सुट्ट्या आल्या की हा on duty त्याच्या training centre किंवा जवळच्या शाखेत हजेरी लावी. (काम न करता) मला मात्र खोटे समज पत्र दिले. त्या पत्रावरून माझा संताप झाला, त्यांना मला त्रास दिल्याचा हेतू साध्य झाला म्हणून विकृत आनंद झाला. माझी करियर खराब केल्याचे समाधान हे चक्र सुरू झाले. मोनाली, कांडे, कृष्णा, श्रीधर या सर्वांना सामील होती. अवैध धंद्याचा एक साखळी भाग होती ती. जेव्हा कांडेने बलात्काराची धमकी दिली तेव्हा त्याचे ते चेक (साखळीतले) मी घ्यावे अशी त्याची ईच्छा होती. मोनालीने त्याच्यातर्फे पैसे ऑफर केले होते.

खरेतर चतुर युक्तिवाद व खोट्या साक्षी या सत्याला पर्याय ठरू शकत नाहीत पण आमच्या संस्थेचा इतिहास बघता ह्या सर्व गोष्टी त्या संस्थेच्या वारशाला अनुकूल होत्या. प्रमोशन न घेतलेले लोक वरिष्ठांवर जळतातच. मात्र ते सत्ता उपभोगाचा विकृत आनंद, क्षेत्रीय कार्यालयात बसून इतरांना त्रास देवून पूर्ण करतात. पोनी कृष्णाच्या जवळ उभी होती. जाड भिंगाच्या चष्म्याआडून कृष्णा हसला.

''हाय हॅण्डसम, सोडू नकोस तिला. ती मला सिनियर होईल, तिला पुन्हा पुन्हा अशी पत्र देत रहा म्हणजे तिचे पाय जमिनीवर राहतील.'' मला वाटले काही स्त्रियांमुळे नोकरी करणाऱ्या स्त्रिया बदनाम होतात. त्यातली एक म्हणजे पोनी. .... नायेगाव, टील्ले सर्व ठिकाणचा तिचा तो भूतकाळ मी जाणून होते पण आज, तिला सत्ता मिळाली होती. रिमोट कंट्रोल मिळाला. माझ्या शाखेत कामाला माणसे नव्हती. मे महीना होता. कर्मचारी रजेवर होते. इथे मात्र गप्पा मंडळ भरले होते.

त्यात पैकरने पुन्हा OFFICE ला बोलावले. रात्रीचे ९ वाजले होते. ४ साक्षीदार होते. एक कागद पुढे ठेवून ''सही करा'' म्हणून दबाव आणू लागला.'' कदम नावाच्या शिपायाला त्याने दारात उभे केले होते. कोणाला आत सोडू नकोस सांगितले होते. बरेच तास मला दम दिला गेला.

अचानक दाराशी गलका ऐकू आला आणि दार उघडून माझा नवरा आत शिरला.'' काय चालले आहे ?''

माझे मिस्टर.

‘‘नाही त्यांना चार्जशीटमधून सोडवता येते का बघतो ?’’ पैकर बिचकून म्हणाला.

‘‘तुम्हीच दिलेत आणि आता तुम्ही काय करणार ? तेव्हा का खोटेपणा केला’’ हे

‘‘माझ्या हातात काही नाही. जी एम खडे ने सांगितले होते. तिला त्रास द्या. मी त्यांच्या सांगण्यावरून केले.’’ पैकर

जी एम खडे नुकताच ४ मे पूर्वी पुण्याहून बदली होऊन आला होता. पण सांगोपांग ऐकीव माहिती वरून असे वागत असावा किंवा त्याला सुद्धा मी संस्थेत नको असेल किंवा पैकर खोटे बोलत असावा.

‘‘तुम्हाला थांबवून ठेवा हे सुद्धा खडेनेच सांगितले.’’ – पैकर.

‘‘ठीक आहे. तुम्ही यापुढे तिच्याशी बोलू नका आणि तिला अवेळी थांबवून घ्यायचे नाही, नाहीतर याद राखा.’’ हे

नवरा मला हाताला धरून चल म्हणून मला बाहेर घेऊन आम्ही घरी आलो. फोन खणखणला. पूर्वी मी ज्या कर्मचारी सभेमध्ये होते तो कोलावरी लीडर म्हणाला – ``wrongful confinement महिलेला डांबून ठेवणे’’अशी तक्रार करा. पैकर तुमच्या फारच मागे लागला आहे.’’ मी हूं म्हणाले. पैकर शाखेच्या भारी गाडीतून गेला. पैकरचा केसही वाकडा झाला नाही. मी

व नवरा पोलीस स्टेशनवर गेलो. मात्र मला बदनामीची भिती वाटू लागली. वर्तमानपत्रात माझ्या नावासकट बातमी झळकते आहे. लोक हसताहेत आणि कांडे व ग्रुप गैरफायदा घेतो आहे, असे वाटू लागले. दुष्ट अंगाला झोंबत आहेत व पैकर हसतो आहे. पोलिसांची भिती ज्यांना वाटायला हवी त्यांना सोडून इतरांनाच वाटते. फक्त कांडेंबद्दल बोलून बाहेर यावे ठरवले पण पैकर सुद्धा दोषी आहेच की, संरक्षण नाकारणारा.

पण पोलिस स्टेशनवर जाईपर्यंतच मला चक्कर आली. पैकरचे नशीब जोरावर तो सुटला. मात्र मी एक सुरक्षितता म्हणून माझ्या युनियनकडे व महिला विभागात तक्रार केली.

पुन्हा एका रिव्ह्यू मिटींगनंतर पैकरने मला पुन्हा त्रास दिलाच. पैकर थांबणार नव्हता. ''बिनताकदीची ती बाई तिला मी सरळ करतो'' म्हणाला. ही गोष्ट आपल्याच राज्यातील एका क्षेत्रिय कार्यालयाची आहे. एक उच्चपदस्थ अधिकारी आपल्या केबीनधील अवतीभोवती रिकाम्या बसलेल्या कोंडाळ्यासमोर सुटलेले पोट खाजवत म्हणाला, ''मी घाबरत नाही. ''बिनताकदीची ती बाई'' ती माझ्याशी काय लढते. बघाच तिला पाणी पाजीन, तिचे तेरावे घालीन भीकेचे वाडगे घेवून संस्थेच्या दाराशी तिला उभा करेन.'' दगड मारल्यावर वेडा बिथरतो, हा अधिकारी असाच बिथरला होता. पर्याय नसलेली, बिनताकदीची, साधी बाई पाय ओढत त्या वातानुकुलित केबीनमधून बाहेर आली. रस्त्यावरच्या न थांबणाऱ्या रिक्षांना हात करीत उभी राहीली.

एका वयानंतर चालणे, पळणे शक्य होत नाही. अपेक्षांचे ओझे नेहमी त्याच व्यक्तिवर लादले जाते, जी काम करते. हातात दिलेला ऑफिसच्या कामाचा गठ्ठा सावरत ती पुढे चालू लागली. ज्या संस्थेत तीस वर्षे नोकरी केली, त्या संस्थेला आता ती नकोशी झाली आहे. खास

जवळच्या, चांगल्या शाखेत सुंदर देखणी तरुणी आणता यावी म्हणून तिला त्या लांबच्या गावी टाकण्यात येणार? जनावर जुनी झाल्यावर त्यांना कत्तलखान्यात पाठवावीत किंवा म्हाताऱ्या आईवडिलांना आता कष्ट होत नाहीत म्हणून वृद्धाश्रमात पाठवावे तसेच! वरिष्ठ व ज्येष्ठ कर्मचारी टाकाऊ नसून टिकावू संपत्ती आहेत हे कळायला बुद्धी हवी. कॉर्पोरेट कल्चर म्हणजे ''कामचोरांना आराम, काम करणाऱ्यांना अधिक काम'' असे असते का? स्त्री म्हणजे काय तरुण सुंदर शरीर? ऑफिसच्या कामातील कौशल्य जाऊ दे! साहेबाला, ''सुंदर शर्ट घातलात हो तुम्ही! असे म्हणून स्तुतीचे पूल न बांधता येणाऱ्या बुद्धीमान तरुणींना, सॉरी वृद्धांना संस्थेत मानाचे स्थान नसावे का? एक वरिष्ठ आपल्या ताब्यातील क्षेत्र आपले खाजगी संस्थान असल्याचे समजतो का? पाय ओढत ती घरी आली. आपापल्या करियरसाठी मुले परदेशी जाणारच हे सत्य तिने स्वीकारले. आपल्या बुद्धीचे या संस्थेत असलेले चीज, आज आपली होणारी फरफट पाहून मुलांनी भारतात रहावे, हा तिचा आग्रह डळमळीत होवू लागला. उलट भारत छोडो! म्हणून त्यांनी अशा अपमानातून सुटावे असेच तिला वाटत होते. भगौड्याच्या हाताखाली काम, कर्ज मंजुरीसाठी, पैशासाठी, वेगवेगळ्या कारणासाठी तिच्यावर दबावच दबाव टाकला केला जात होता. वरिष्ठांचे शब्द म्हणजे चाबकाचे फटकेच होते.

''तेच ते बोलू नका.'' पैकर म्हणाला.

''माझ्या प्रश्नाबद्दलच मी बोलणार'' – मी

''माझ्याकडे गप्पा मारायला या, प्रश्न घेऊन नको.'' – पैकर

शाखेची एक तथाकथित महिला शोषणाविरोधी कमिटी होती त्यांच्याकडे गेली. ‘‘तुम्ही पैकरने चार्जशीट

दिली म्हणून बोललात. आधी का सांगितले नाही ?’’ – ती कमिटी

‘‘मग काय मी आधीच छतावर कावळ्यासारखी कावकाव करायची ? त्याला मी सुधारण्याची संधी दिली.’’ – मी

पण पैकरला इतका सत्तेचा माज होता की तो सुधारणेच शक्य नव्हते. शिवाय तो मी हे खडेच्या सांगण्यावरून वागतो आहे असे सांगत होता. मात्र मी जाणून बुजून खोटी तक्रार करते असा भाव निर्माण करण्यात आला.

पोलीस केस करावी. विशाखा विरुद्ध सुप्रीम कोर्ट या जजमेंटनुसार महिला आयोगाकडे जावे का ? की माफ करावे ? ज्याचे त्याचे नशीब असते. पैकर सारख्या माणसाला यश मिळत गेले. त्याची सर्व सिद्ध झालेल्या आरोपांतून निर्दोष मुक्तता झाली. मला बोगस चार्जशीट देवून छळ करणारा खिदळत व मजेत ऑफिसला शेवटपर्यंत जात राहीला.

या देशात गांधीजींना १९४८ मध्येच बंदुकीच्या गोळ्यांनी मारुन टाकले आहे. माझा विरोध या संस्थेने या पूर्वीच दाबून टाकला आहे. सत्य शहीद झाले आहे. एखाद्या स्वतंत्र विचाराच्या स्त्रीने जर विरोध केला तर तिच्या मेंदूतील तो विरोधाचा विचार छाटून काढायला पैकर सारख्यांची फौज ठाण्याला बसलेली आहेच.

ठाण्याचा राडा, ठाण्याचे मनोरुग्णालय, पूर्ण महाराष्ट्रात संस्थेत प्रसिद्ध आहे. बरेच जण या फटक्यांनी जखमी होतात. पण तक्रार करायला धजत नाही. सीसीटीव्ही लावला म्हणजे वॉचमन द्यायची गरज नाही असे साहेब म्हणे! ''सबसे बड़ा रुपैय्या! अशा गावात कर्जमंजूर करा अन्यथा बडतर्फ करू'' अशा धमक्या सहन करून बरेच दिवस काढले. साहेब अशा ऑफिसेसला भेट दिली की ''खातो, पितो, पुष्पगुच्छ आणि सत्कार स्वीकारतो. ना तक्रारी सोडवतो ना अडचणीच्या वेळी येतो.''

बलात्कार ही भिती ''स्त्री'' आहे म्हणून सर्वच वयात असते, वॉचमन दिला तर फरक पडू शकतो. दुसऱ्या दिवशी ती बिन ताकदीची बाई पुन्हा त्याच पैची सुद्धा बुद्धी न वापरणाऱ्या साहेबाकडे गेली. भितीवर मात करून या पूर्वीच काही महिलांनी तक्रार केली असती तर ''ही'' विष पसरवणारी वृत्ती थांबली असती. साहेबांच्या केबीनमध्ये दोन तीन जण खिदळत बसले होते. तिला पुढे ऑफिसला कस्तुरबेला जायचे होते, हा साहेब दिवसभर गप्पा मारायला मोकळा होता. तिच्या अडचणीच्या वेळी एक कर्मचारी न देणाऱ्या या क्षेत्रिय ऑफिसमध्ये प्रदर्शन मांडल्याप्रमाणे भरपूर स्टाफ होता व तो कामाने शीणला असावा असे वाटत नव्हते.

साहेबांच्या गप्पा चालू होत्या. मी साहेबांच्या सेक्रेटरीला सांगून आत प्रवेश केला. ''साहेब मला माझ्या अब्रूची भिती वाटते, वॉचमन द्या किंवा सध्या ही धमकी आली आहे, तक्रारी होत आहेत म्हणून इतर कुठे काही दिवस घराजवळ बदली द्या.'' बिनताकदीची बाई विनवणी करू लागली.

‘‘अहो माझ्या ऑफिसात बसायला पुरेशा खुर्च्या नाहीत, माझ्याकडे खूप अधिकारी, कर्मचारी आहेत. तुम्ही दुसऱ्या आदिवासी शाखेत डहाणूला जा. ही जागा इतर चांगल्या बाईसाठी खाली करा. (त्या शाखेत लेडीजच प्रबंधक येतात) अहो आणि तुमचे वय बघा! ह्या तुमच्या वयात तुमच्यावर कोण बलात्कार करेल?’’

‘‘गप्प बसा! वॉचमन काही मिळणार नाही. तुम्हीच अर्ज लिहा, द्या, डहाणू धुंदलवाडीला बदली करून घ्या. चांगली प्रबंधक त्या तुमच्या जागेवर येईल!!’– भैय्या. ती बाहेर पडली मनात समजली या जून संस्थेला अंधकारमय भविष्या व्यतिरिक्त काहीच नाही. मग त्याच दिवशी त्या बिन ताकदीच्या बाईने, बदलीसाठी नाईलाजानेच अर्ज दिला - यथावकाश, ‘‘बलात्कार कोण करेल?’’ यावर चर्चेची, टीकेची पात्र ती बाईच ठरली. तिला वाटत होते लेखी तक्रार करावी, मात्र ‘‘मान सांगावा जनात, अपमान ठेवावा मनात’’ म्हणून ती गप्प बसली. पण ते जाणणारेही कमीच असतात.

पैकर तरबेज होता. असे गुन्हेगार गुन्हे नाकबूल करून पार विसरून ‘‘गजनी’’होतात. शिवाय साक्षीदार फितवण्यात व जमवण्यात ती तरबेज नव्हती. बदलीच्या गावी ती बिन ताकदीची बाई रुजू होणार होती. संस्थेतील खुर्चीवर बसलेल्या ‘‘पै’’ची सुद्धा जबाबदारी ‘‘न’’ घेणाऱ्या संस्थानिकांची ताकत ओळखून ती गप्प बसली. जर ती गप्प बसली नसती तर हाताखालच्या चमच्यांच्या साक्षीने ‘‘तिने उद्धट वर्तणूक केली, शिव्या दिल्या’ असाही आरोप साक्षी पुराव्यांसह सिद्ध करायची ताकत पैकरमध्ये होती. ‘‘बंदा रुपया’’ अशी खणखणीत नाणीच असलेल्या कर्मचाऱ्यांविरुद्ध पै-पैशाची लायकी नसलेले लोक सत्ता वापरू शकत होते. म्हणून ती

गप्प बसली अजून छळ सहन करणे तिला शक्य नव्हते.! गोष्ट इथे संपते का? बदली करणे, त्रास देणे, त्या गावातून बाहेर पडू देणे, या संस्थानिकाच्याच हातात होते. त्यामुळे अब्रूसाठी गप्प बसली. पण त्यामुळे काय झाले? म्हातारी मेली काळ सोकावला आणि तिच्यावर अन्यायाची मालिका सुरू झाली. आर्थिक दुर्व्यवहारात साथ देणाऱ्यांच्या मदतीने त्या बिनताकदीच्या बाईचे खच्चीकरण सुरू झाले. साहेबाचे संस्थानिकांची केबीन जणू ''छळछावण्या कुठे असाव्यात व छळ कसा करावा'' याची योजना करणारा अड्डा होता. खरे तर स्त्री, वय आणि बलात्काराबद्दलची माहिती अपडेट करण्यासाठी संस्थानिकाला बलात्कारासाठी प्रसिद्ध विभागात पाठवावे. मुंबई-महाराष्ट्रात ठेवू नये असे त्या बिनताकदीच्या बाईला वाटते पण तिला कोण विचारणार? त्यानंतर तक्रार करायला हिंमत आल्यावर तिने तक्रार करण्याचा प्रयत्न केला. ''झाशीची राणी'' बनते आहे, तशीच धारातीर्थी पडेल असे म्हणतात. पण तक्रार करणे गुन्हा असतो का? झाशीच्या राणीचा आदर्श चूक आहे का? ही शंभर वर्षे जुनी संस्था अशा उथळ, अविचारी, महिलांबद्दल विकृतीने दुष्ट विचार करणाऱ्या माणसाच्या मागे उभी राहू शकते? प्रश्न तिचा त्या बाईचा आहे म्हणून बाकीचे लोक गप्प बसू शकतात? अशी वेळ कुणावरही येवू शकते. गोष्ट इथे संपत नाही. मिर्च मसालामध्ये ज्याप्रमाणे विकृत अशा सरदाराच्या डोळ्यात मिर्ची पावडर स्त्रियाच टाकतात तशी वेळ आली आहे. ही वेळ होती सर्वांनी त्या बिनताकदीच्या बाईमागे खंबीरपणे उभे राहून हा लढा यशस्वी करण्याची! आदर्श मेले नाही पाहिजेत.

कस्तुरबेहून परत येतांना दिसणाऱ्या तलावात पानबगळे डुंबत होते. टिटव्या ओरडत होत्या. झाडांवर चिमण्या व चुबूक पक्षी ओरडत होते. मी मात्र अबोल झाले होते.

‘‘स्त्री ही आई, बहीण मुलगी असते तिचा सन्मान व्हायलाच हवा!’’ ही वाक्ये पुस्तकांतच शोभतात.

प्रत्यक्षात स्वार्थच मोठा ठरतो हे सत्य आहे.

पुढचा फास, पैकर, कांडे आणि कंपनीने संगनमताने रचला. दिनांक १५/४ रोजी कांडेने पोलीसांत मी त्याला बलात्कार केला अशी खोटी तक्रार दाखल करीन अशी धमकी त्याला दिली. अशी तक्रार त्याने पोलीसांत दिली.

कांडे नीच होता हे दुःख होतेच. पण संस्थेचे लोक शेणातल्या किड्यांसारखे वागत होते. हे मोठे दुःख होते. कांडेने शाखेत पोलीस पाठवला. नेहमीप्रमाणे मोनाली त्या दिवशी सुट्टीवर होती. मे महिना, खूप काम, रजा त्यात HRMS चे नाटक OFFICE ला करायचे होते. स्वतःकडे ७० माणसे रिकामी पडलेली असतानाही व माझ्याकडे स्टाफ नसतानाही कृष्णा म्हणाला, ‘‘आम्हाला खूप काम आहे, तुम्ही दहापर्यंत बसा.’’

बलात्काराची धमकी ज्या स्त्रीला दिली जाते तिला दहापर्यंत बसा असे सांगण्या इतपत कृष्णा व पैकर निर्लज्ज होते. शाखेचे अर्धे काम करून मी ६.३० वाजता पोलीस स्टेशनवर गेले.

खरे तर पैकर माझ्या बरोबर स्वतः येऊ शकत होता. एखादी दूसरी व्यक्ती पाठवू शकत होता, पण जे चालू होते त्यात पैकरला मजा येत होती. मला फोन केल्यावर त्याने पहिले

वाक्य टाकले ‘‘सांगत होतो साखळी चेक घ्या. त्याच्याबरोबर बोला, गप्पा मारा तो सांगतो तसे वागा.’’

कस्तुरबे पोलीसांनी जबाब लिहून घेतला. कांडेला सुद्धा बोलावले. मी घरी गेले. जाताना ती झाडी, ते पक्षी, ती फुले नी गार हवा. सर्व तेच होते पण मी ‘ती’ नव्हते. पैकर फोनवर म्हणाला, ‘‘पोलीसांनी तुम्हाला त्रास दिला का?’’

‘‘तुमची ती इच्छा होती का?’’ मी

‘‘तसे काही असेल तर सांगा. मी येतो’’ पैकर

‘‘म्हणजे तसे काही झाल्यावर पोलीस स्टेशनला यायचा विचार होता का?’’ असे भ्याड भेकड पुरुष ज्या संस्थेत आहेत ती संस्था काही वर्षात नक्कीच बंद होईल? पैकर एसीपीला फोन करू शकत होता, स्वतः २० मिनिटांत येऊ शकत होता. वर म्हणाला –

‘‘आता त्या शाखेतून बदली घ्या नाही तर पोलीस सुद्धा बरोबर नसतात, कांडे कडून जो धोका वाटतो तो पोलीसांकडून सुद्धा आहेच. तुमच्या नशिबी बलात्कार होणेच दिसते आहे.’’ मी कस्तुरीपक्षी शोधणे सोडले.

मी बदलीचा अर्ज दिला. मोनालीला आनंद झाला.

काम करण्यासाठी माझ्या क्षेत्रात मला आवश्यक ते मी शिकते. ते लोक काम शिकायच्या ऐवजी टिकून राहणे शिकले. त्यांच्या पदोन्नती अभ्यासक्रमात कुर्निसात करणे,

हाताखालच्यांना मेमो ऑफिस ऑर्डर देणे, स्वतः सारखे ट्रेनिंगला जाणे, खूप काम शाखेत आले की ॲक्सिडेंट झाला म्हणून ॲडमिट कसे व्हायचे हे सामील होते. मला मात्र काम जमून उपयोग नव्हता. माझ्या नशीबी मेहनत होती. काम येत नाही म्हणणाऱ्याला शिकवणार कोण? त्यापेक्षा दुसऱ्या काम करणाऱ्याकडून करून घ्या, म्हणून सर्व काम माझ्याकडूनच केले गेले.

ना इज्जत की चिंता

ना फिक्र कोई अपमान की

जय बोलो बेईमान की।

जेव्हा पैकर म्हणे ''तुमचे तेरावे घालीन'' तेव्हा एक साहेब (हाताखालचा) म्हणे ''माझे भाग्यच साहेब ते तुम्ही माझे तेरावे घालाल पण काय चूक झाली ते तरी सांगा.''

अशी लाचार फौज असल्यावर बेईमानच फळणार. जुन्या जखमा कधीही बुजणाऱ्या नव्हत्या. पण नव्या जखमा नको म्हणून मी कोषात शिरले ना! जुन्या सर्वांबद्दल मी क्षमाभावना ठेवली म्हणजे त्यांच्या गुन्ह्यांकडे मी दुर्लक्ष केले.

संस्था शंभर वर्षांची होणार. १०१ व्या वर्षात पदार्पण करणार म्हणून. मी बाहेर काही गोष्टी सांगणे टाळत होते. १९९८ पासून मी वर्तमानपत्र आणि पत्रकारिता या क्षेत्रात सक्रिय होते. पण मी गप्प बसू इच्छित होते. 'महिला संरक्षणाची ऐसी तैसी' हा लेख माझ्या एका वर्तमानपत्रातील मित्राने छापून तयार ठेवला होता. पण मी त्याला गप्प करीत होते. आडून आडून चौकशी करून

माझेही नाव त्यात येऊन मी चर्चेचा विषय बनू शकत होते. खरी तक्रार आणि खोटी तक्रार यातील फरक पोलीसांनी जाणला होता व मला संरक्षण दिले.

मी त्याला सांगितले, ‘‘मी संस्थेत असे पर्यंत असे काही छापू नकोस.’’

इतर स्त्रियांपैकी कुणी तक्रार केली तर छापा. मात्र नंतर एका महिलेने तर FIR च दाखल केला पण वर्तमानपत्रांनी ते छापले नाही. माझी कामगार संघटना खंबीर होती. त्यांनी सांगितले. आम्ही मोर्चा काढू आणि मिडियाला बोलवू तिला त्रास होतोय. पण पैकरने सर्व दाबले.

मी नोकरी सोडावी असे माझ्या एका कलीगने सुचवले. ‘‘तू पुस्तके वाच, लिही, शिक्षण कर, पक्षी निरीक्षणाचा छंद पुढे चालव. तुझ्या पक्षीमित्र संघटनेचे काम कर’’- भोळकर

‘‘माझ्याच अस्तित्वाचा प्रश्न आहे, पक्षी वाचवा चिमण्या वाचवा सांगायला मी तर जगली पाहिजे’’ – मी

‘‘आमच्या वर्तमानपत्रातर्फे तुला संरक्षण देऊ. तू मी जीवंत असे पर्यंत काळजी करू नको. धमकी देणारे तुझ्या आसपास फिरकणार नाही याची खबरदारी मी घेतो.’’ - भोळकर

‘‘३० वर्षे मी ज्या संस्थेत काम केले तिथे कुणाला माझी किंमत नाही. ते लोक मला संरक्षण देत नाहीत आणि १२ वर्षे ओळख असलेले तुम्ही देता.’’ मी

‘‘मैत्री ही किती वर्षे झाली यावर अवलंबून नसते’’ भोळकर

‘‘३४००० कर्मचाऱ्यांमधील एक एवढीच माझी किंमत माझ्या संस्थेला आहे, मी तर तुमच्या संस्थेची सुद्धा नाही’’ मी

‘‘चांगुलपणाचा एक वारसा असतो तो टिकवावा लागतो. मी जर कुणी मदत मागत असताना हात पुढे केला नाही तर माझ्यासाठी कोण करेल’’ भोळकर

‘‘मी त्या संस्थेतच वेगळी आहे का ?’’ मी

‘‘नाही त्या संस्थेचेच काही तरी बिनसले आहे’’ भोळकर

‘‘तू माझ्या समाधानासाठी सांगतो’’ – मी

‘‘तक्रारकर्त्यांचा छळ, सेवानिवृत्तांना त्रास अशा बातम्या तुझ्या संस्थेबद्दल वेगवेगळ्या वर्तमानपत्रात येतात. तुझ्या संस्थेच्या किती कोर्ट केसेस गाजतात ते आठव.’’ – भोळकर

‘‘पूर्वीच्या शाखेचे व आत्ताचे Audit एकाच वेळी का चालवले नाही ? साहेब हा वरिष्ठ होता पण श्रेष्ठ नव्हता.’’ – मी

‘‘मुख्य म्हणजे साहेब होता.’’भोळकर

मी काम का केले ? माझे काय अडले होते ? असा भाव घेवून बाकीचे कर्मचारी बघत होते. अपयश यायला कारण थोडीच लागते ? काम केले नाही – अपयश. काम केले – अपयश. अपयश ही रीलेटीव्ह टर्म असते. साहेब हवा तसा वागू शकतो, इतरांचे अपयश ठरवणे हे

तथाकथित वरिष्ठ व यशस्वी लोकांच्या हातात असते. माझ्या कष्टांवर इतरांची मौज-मजा चालू होती, माझी शक्ती वापरून त्यांची विश्रांती होती. चांगुलपणाच्या त्यांच्या व माझ्या मूळ कल्पना वेगळ्या होत्या. पण यशाची कल्पना दोघांची एकच होती आणि या विपरीत करणीच्या युगात कलियुगात मी अपयशी ठरले होते. नवऱ्याचा पूर्ण आधार व रक्षण असूनही मला असे वागवले जात होते. विधवांवर काय? घटस्फोटीतांवर प्रौढ कुमारिकांवर काय गुजरणार होते? किती जणांना माफ करून मी पुचाट बनले होते. सर्वच्या सर्व अपयशांची जबाबदारी माझ्यावरच लादण्यात आली होती. जे घडेल ते बघत राहणे व सहन करणेच हातात उरले. जवळ बघत राहीले, रोज नवीन आघात, जाणूनबुजून केलेले आरोप छळ चालू होता. दूरचे बघायचे राहिले. लंबी रेस का घोडा किंवा दूर की सोच म्हणतात ती कळलीच नाही. कदाचित त्यांना मात्र ते कळले होते. म्हणूनच त्यांना मला सोडायचे नव्हते. मात्र मला बळीचा बकरासुद्धा करायचे होते. सर्वच साध्या चांदण्या चंद्राजवळ जावू शकत नाहीत. त्या चमचमतात व दृष्टीआड होतात. आनंदाकडे आनंद जातो तसा प्रश्नांकडे प्रश्नच येत होता. या संस्थेशी संबंध तोडणे आवश्यकच होते. कटुता टाळण्यासाठी, ऊर्जेच्या, सृजनशीलतेच्या नव्या विश्वाशी नाळ जोडून MSW किंवा संशोधन करायला हवे होते. त्या डबक्यात राहून हरले.

भोलानाथ-भोलानाथ पाऊस पडू दे

ऑफिसभोवती तळे साचून ऑफिस बुडू दे

असे म्हणण्याएवढा त्या ऑफिसचा राग येई. काहींची काय-काय काम मी करणार नाही ही यादी मोठी असे त्यापेक्षा काय करणार सांगून थोडक्यात होईल असेही लोक होते.

शेवाळ्यावरून कुणीही घसरण्याची शक्यता असते पण या संस्थेतील काही जणांची नितीच घसरण्याची असते. चिंध्या झाल्या आहेत, नितीनियमांच्या!

संस्थेचा सूर्य लवकरच ढळणार आहे. मी मेहनत करून कोसळले तरीही! एकदा टेबलाखाली पाकिटातून पैसे घेताना श्री --- ला बघितले. मी कशा प्रकारे प्रतिक्रिया देते हे तो बघत होता. मी आरडाओरडा केल्यावर तो ''तिच्या डोक्यावर परिणाम झाला आहे'' म्हणाला असता.

सुपुनी (नवीन) संस्थेत आली. तिला मी वेगळेच काहीतरी करताना बघितले. मी गप्प बसले. तिला विकृत आनंद झाला. निर्लज्जम सदा सुखी! पैकर नावाचा माणूस वेगवेगळ्या प्रकारे अनैतिक काम करी, मी विरोध करताच मी स्त्री म्हणून माझी बदनामी करी. 'कोलावरी डी'चा एक कंपू मॅनेजरने पाळला होता. मी मॅनेजर पण मलाच परकी ठरवून हा कंपू माझी कंपनी चालवत होता. एका पाठोपाठ दहा कोलावरी हजर झाले होते व ही जमात मला डोईजड झाली होती. कुठलेही व्यवहार चोख नव्हते. मात्र हिशोब तयार केले जात होते.

तेच ते अनुभव घेऊन मी नव्याने नवी होत होते. दुखावले जात होते. वरण भाती शेवंतीच्या वेणीत सोनेरी चंदेरी कलाबुत यावे तसे काही सोनकेवड्याच्या गंधाचे क्षण येत होते. पण तुरळक! रजत रंगी, रेशीमलडी आयुष्य शक्यच नव्हते. सृजनाचा रंग केशरी असतो पण वीरांच्या त्या रक्ताचा रंगही त्याच रंगाशी जुळणारा असतो. माझ्या वाहणाऱ्या घामाला रक्ताचा रंग चढू लागल्यावर वाटले कुठे तरी थांबायला हवे.

कवितेची मशागत करणारा शेतकरी म्हणजे कवि! पण स्वतःच्याच जीवनाची मशागत करणे या महानगरात अवघड असते, उद्धट फेरीवाले, बाजूच्या एका मंदीरातील गुरवीण व

पुजारी माझ्या कंपनीच्या दारात उभे राहून चित्रविचित्र बोलत असत. त्यांची अनधिकृत बांधकामे दारापर्यंत आली होती.

एखाद्या विशेष दिवशी ती पुजारीण मुद्दामच माझ्या कंपनीच्या दारात लिंबू मिरची टाकून जाई. गाडीचा धक्का लागो न लागो गाडीचा धक्का लागला म्हणून भांडण करीत असे. बाजूचा चणेवाला, समोरचा दूधाची अनधिकृत टपरी चालवणारा यांना ती कंपनी बंद व्हावी असे वाटत होते. कारण त्यांनी त्यांचे हात पाय माझ्या कंपनीच्या दारापर्यंत पोहोचले होते. त्यांना हाकलण्यासाठी माझीच जागा मिळवण्यासाठी मला कोर्टात लढावे लागत होते. अंगणातील झाडे किती सोशिक असतात, पण तीही जमीनदोस्त केली गेली. झाडे एकोप्याने राहत असली तरी एकेकटयाने झुंजत राहतात. तशी मीही झुंजत होते. झाडे किती सोशिक असतात. मौसम पाहून रंग बदलतात आणि कधी तरी प्रदूषण सहन न होवून मरुन जातात. एक कर्मचारी श्री जाधव वारले.

यू सारी जिंदगी मरमरके जी लिये

कुछ पल तो अब हमें

जीने दो जीने दो

हे गाणे नाही, सत्य होते. हे मला उमगले. किरकिर करत करत मी स्वतःचा आनंद उपभोगू शकणार नाही. इतकी त्रासले. दोष नशीबाचा होता.

लायकी रेसच्या घोड्याची

पण टांग्याला जोड गेलो

घोडा घोडा करता करता

डोक्यालाच घोडा लागला

हो, संघर्षातच जन्म गेला

(संग्रहीत)

सर्वांत सुंदर मोती बनण्यासाठी ज्या प्रमाणे सीप किड्याला त्रास दिला जातो, ज्या शिंपल्यातील किड्याला विविध प्रकारे त्रास देवून मोती अधिक किंमती चमकदार बनावा म्हणून प्रयत्न करीत असतात. मोती जलात राहतो, मीन पाण्यात राहतो पण तृषार्तच करतो, तसे माझ्याबाबत झाले.

दुकान चालवणारे, रिक्षावाले, पानवाले किरकोळ विक्रेते यांना माझी हळवी वृत्ती कळली व त्यांनी झुंडीने हल्ला करायला सुरवात केली. एक मुंगी हत्तीच्या कानात जावून हत्ती जमीनदोस्त करते. एक टिटवी राजाला, बादशहाला सुद्धा हताश करू शकते हे कळले. थोडे शब्दसुद्धा पुष्कराज रत्नाप्रमाणे तेजस्वी असू शकतात, पण ते जाणणारे सूज्ञ इथे नव्हते. संध्याकाळची चाहूल दबक्या पायांनी लागे, खाजगी नातेसंबंधांची तीव्र जाणीव उफाळली, ताण बाहेर जातो पण आत उरतो असे क्षण कंपनीत आले. दोन दोन वेळा एक वाक्य उच्चारून मी एकदा समजून घ्यायचा प्रयत्न करते. दुसऱ्यांदा ते झिरपवण्याचा प्रयत्न करते असे व्हायला लागले. मात्र माझे म्हणणे कुणीही ऐकून घेईना. कंपनीत जाणे बंद केल्यावर यांचे पोट भरणे कधीतरी बंद होईल

ही सुद्धा जाणीव कुणाला नव्हती. माझे पोट मारले जावे असे वाटत असावे. समाजात मुंग्यांची वारुळे जमलेली असतात. त्यांचा दंश सहन न होवून मी दारे बंद केली. चांगल्या संस्थेत वैयक्तिक अडचणींचा आदर केला जातो, जगण्याच्या रितीचा आदर होतो. मात्र या संस्थेत टाळ्यांमध्ये व स्तुतीसुमनांमध्ये वेळ घालवणारे काम करू शकत नाहीत व इतरांच्या जगण्याचा आदर करीत नाही. पण पोटासाठी, मी कस्तुरब्याहून बाहेर पडले. मी बदली स्वीकारली. पैकर नीनाला त्या शाखेत आणण्यासाठी झटला. पण नीनाऐवजी माझ्यानंतर तिथे अन्य बाई आली. माझे दाणे-पाणी संपले होते.

★★★

# भाग - २

## स्थलांतरीत पक्षी

मी ज्यावेळी नव्या बदलीच्या गावी हजर झाले तेव्हा दरवाजाचे कुलूप उघडताच एक निळा केशरी पक्षी रुसव्या तोंडाने त्या तुटक्या दरवाजाच्या वरच्या खोप्यातून किर्र-खुर आवाज करीत उडाला. त्यानंतर समोरच्या तारेवर बसून राहीला. रागावलेल्या डोळ्याने व रुसलेल्या भावाने बराचवेळ तारेवर बसल्यानंतर केवळ नाईलाजानेच तो मग समोरच्या पिंपळपारावर येवून बसला. पावसाची रिमझीम सुरू झाली, नाईलाजाने तो त्या झाडाच्या ढोलीत शिरला. काही वेळाने पाऊस थांबला तेव्हा फांदीवर बसून तो पंखावरचे पाणी झटकत होता.

मला त्यानंतर दोन दिवस सुट्टी होती. मी मुंबईला आले. परत गेले तेव्हा मला माझ्या स्थलांतराबद्दलच वाईट वाटत होते. मी जड मनाने कुलूप उघडले. किर्रखुट आवाज करीत तो पक्षी परत उडून गेला. रागारागाने तो मला खुन्नस देत फांदीवर बसला. ''आली परत, माझा हक्क हिसकावून घेते'' अशी कुर्र अशी शिट्टी देत तो तक्रार करीत होता. त्याची अंडी त्याची पिल्ले तिथे होती. मागे परसात लाल बुड्या बुलबुल व भारद्वाज पक्षी येई. या पक्ष्यांना सुद्धा निराशा येत असेल का ? माणसांना निराशा येते हे त्या पक्ष्याला माहीत असेल का ?

मला पक्षी निरीक्षणाचा छंदच जडला. कस्तुरीपक्षी पुन्हा एकदा शोधायचे ठरवले.

एवढासा पक्षीसुद्धा माझ्याकडे मी त्याचे घर हिसकावून, त्याला बेघर केल्याचा, निषेध करीत होता. त्याला कदाचित नवीन घरटे मिळाले नसेल किंवा जे मिळाले ते आवडत नसेल पण तो रागावल्यासारखा आवाज करीत माझ्याकडे बघुन गुरगुरत असे. हळूहळू तो झुकू लागला, बसका वाटू लागला. नंतर हळू हळू त्याचा मोरपिसी रंग काळवंडला. मी सुद्धा मुंबईहून जा-ये करून काळवंडू लागली. मी सुद्धा माझे घर सोडून दूर राहून कंटाळले. चिडचिड निषेध व्यक्त करून बदलीचा निषेध करून थकले. आयुष्य म्हणजे काही हिंदी सिनेमा नसतो ''हे भगवान, ओ पालन हारे'' असे गाणे म्हणताच देव कृपा करून इच्छापूर्ती करायला येतो. हे फक्त सिनेमातच! बाकी बदली म्हणजे कधीकधी घेतलेला बदला असतो.

मी त्या पक्ष्याचा हक्क हिसकावला.

माझा हक्क सुद्धा कुणीतरी हिसकावला होता. माझे स्थलांतर मला जसे त्रास देत होते तसे ते त्यालाही देत होते. पक्ष्यांचे प्रश्न कुणाला कळत नव्हते. पण हल्ली फ्लेमिंगो, सारस पक्षी, मायग्रेटींग बर्डस नावाने पक्ष्यांची कौतुके होतात. माणसाचे तसे कौतुक का होत नाही? स्थलांतरानंतरची मनाची मानसिकता समजणे अवघड असते. हल्ली तो स्थलांतरीत पक्षी मला दिसत नाही. कस्तुरी पक्ष्याप्रमाणे नष्ट झाला असेल का?

निळी ओढणी पांघरून वसलेल्या नवगाव अलिबागला माझी बदली झाली. गावी मला खूप मैत्रिणी मिळाल्या. संध्याकाळी समुद्रकिनारी ''हं! जरा विसावू या वळणावर'' म्हणत मी रेतीत बसले तो नितळ निळा समुद्र मला स्तिमित करत होता. कायमच खूप बडबड करणाऱ्या आम्ही

मैत्रिणी आश्चर्यचकित होवून त्या समुद्राची गाज ऐकत होतो, अलिबागच्या समुद्रकिनाऱ्यावरून तो कुलाबा किल्ला दिसत होता. आतील गणपती मंदिरावरचे भगवे झेंडे खुलत होते.

समुद्र किनारी निःशब्द शांतता होती. अगदी खामोशी! म्हणजे खामोशी शब्दात जे आहे ते! एखादा समुद्रपक्षी Seagull वरून पंख पसरून उडत होता. एरवी कल्लोळ करणाऱ्या त्या समुद्र पक्ष्याला जणू खामोशीने ग्रासले होते. नारळीची झाडे लयबद्ध झुलत होती. मी जणू समुद्र पक्षी बनले होते. समोर निळाशार समुद्र पसरला होता, अथांग! जणू पृथ्वीने निळी ओढणी पांघरली होती. ती समुद्र किनाऱ्यांच्या काळा खडकांवर बसलेली शांतता मला तरुणीच वाटत होते. वाटत होते. म्हणावे,

''एक लड़की को देखा तो ऐसा लगा

जैसे बीना की तार जैसे....

वगैरे वगैरे.... ती तरुणी समुद्राची ओढणी घेवून होती. समुद्रकिनारी वावरणारी साधी भाबडी माणसे आपापल्या कामात मग्न होती. त्यांच्या या भाबडेपणामुळेच कदाचित साध्या माणसाला ''अलिबाग से आयेला है क्या रे?'' असे म्हणायची पद्धती आली असेल. माशाचे जाळे पसरवणारे काही बांधव काम करत होते. बांधलेल्या बोटी पाण्याबरोबर वरखाली अशी संथ लयबद्ध हालचाल करीत होत्या. लाट वर येते उंच उडी घेते आणि आपटून फुटते किंवा ती ती जिरून जाते. तरीही ती पुढे पुढे धावतच असते. समुद्रपक्षी उडताना वेगळाच दिसतो व घरट्यात वेगळा दिसतो. समुद्राचीही दोन रुपे? थोड्या वेळापूर्वी या किनाऱ्यावर ओहोटीमुळे कितीतरी घाण पसरली होती,

आता त्या भरतीच्या लाटांमध्ये दिसेना झाली होती. म्हणजे त्या गोष्टी अस्तित्वात होत्याच, मात्र भरतीच्या उल्हासात त्या दिसत नव्हत्या. लक्षात येत नव्हत्या. माणसाच्या मनाचा त्या समुद्राच्या भरती ओहोटीशी संबंध म्हणूनच असतो. म्हणूनच तर समुद्राला बिलोरी आयना म्हणतात. समुद्राची भाषा मला गूढ वाटते, तरीही समुद्र मला मित्र वाटतो. सूर्य किरणांनी माघार घ्यायला सुरुवात केली. टप्प्याटप्प्याने अंधार समुद्रावर पसरू लागला. लाटेच्या आवाजा वरूनच फक्त त्या समुद्राचे अस्तित्व कळत होते. मी समुद्र किनाऱ्याच्या त्या खडकावरून उठले व क्षणभर समुद्राशी संवाद केला व म्हटले जरा विसावू या वळणावर ''लढ झगड आगे बढ़'' म्हणणे सोपे असते पण... शिवाय पैसे खाणारे लोक मग आपल्यामागे जास्तच लागतात. पुढच्या आठवड्यात कोकणात जूनचा पाऊस मुसळधार पडत होता. रस्ते, गाड्या बंद झाल्याने मुलापासून दूर अडकून पडले. भातपेरणीचे दिवस होते. नदीला पूर आला होता. शाखेत पाणी भरले होते.

गाय वासरू, आईची माया, हल्ली गाय दूध देते हे मुलांना पुस्तकात वाचूनच कळते, सर्व झाडांचे बोन्साय ते सुद्धा फक्त प्रदर्शनातच बघायला मिळतात. House arest चा आठवा दिवस होता. जे चालू होते ते योग्य नव्हतेच पण ते थांबवून म्हणजे थांबवायला प्रयत्न करून हरले. न आवडणाऱ्या शाळेत मुलाने जावे तशी अजून काही वर्षे जाऊ शकले असते मी का ती शाखा सोडली ? कुटुंबापासून दूर राहणे माझ्यावर लादले गेले.

राजीनामा दिल्यावर परत मागे घेणे, पुन्हा देणे असे प्रकार साळुंके करीत असे. माझ्या मनात तसे कधी आले नाही पण आता वाटते खरेच नोकरी सोडणे हा निर्णय सोपा नसतो.

कशी काय लोकं सारखी नोकरी बदलत असतील? सर्व हसतात पण त्यांना जे प्रश्न पडत असतील ते प्रश्न इतरांना पटवून देवू शकत नसतील.

एक ग्राहक भेटला. हाच पूर्वी एकीला बलात्काराच्या धमक्या देत असे. फार वर्षांपूर्वी महारानी पद्मिनीला अल्लाउद्दीन खिलजीला आरशात दाखवण्यात आले होते. आता नालायकांना अनेक पद्मिनी डोळ्यांनी बघायला मिळतात. माझ्यानंतर त्या कस्तुरबा ऑफिसला आलेली बाई फोनवर म्हणाली –

''अगं धमक्या देणे वेगळे. बलात्कार केल्यावर तो सुटला असता का?''

''नंतर त्याचे काय होईल यापेक्षा मला आज माझे रक्षण करणे भाग होते. त्यामुळे मी भितीपोटी बाहेर पडले हे अपयश माझे की क्या संस्थेचे? मी खोटे कर्जप्रकरण मंजूर करीत नाही म्हणून त्याने माझ्या विरुद्ध सही मोहीम उघडली, माझ्याविरुद्ध कटकारस्थाने केली.'' – मी

नवीन आलेली बाई म्हणाली – ''हात धरून तर सह्या घेणार नव्हते, नाहीच करायचे काम, त्याने एक तक्रार केली तर तू चार करायच्या. पळून का गेलीस? त्याच्या तक्रारींना कोण ऐकणार होते.''

''पण काही विकृत त्याच्या तक्रारी ऐकणारे सुद्धा होते. माझे हसे होत होते. शिवाय ती माणसे इतकी विकृत व बिन चेहऱ्याची होती.'' – मी. ''त्यांनी बलात्कार केला ही असता'' व ''अज्ञात इसमाविरुद्ध गुन्हा दाखल केला आहे'' असे लिहून गप्प बसले असते का? करणारे, धमक्या देणारे ज्ञान असूनही अज्ञात इसमाविरुद्ध गुन्हा? मी गप्प बसले.

समोर तो निळाशार समुद्र पसरला होता. पांढरी फुले हलावी तशी एखादी तुरळक लाट येत होती, ओहोटीमुळे समुद्र किनारी सर्वत्र घाण पसरली होती. खरे तर जे अंतरंगात असते व ज्याचे अस्तित्व स्वीकारणे अवघड असते ते ओहोटीच्या वेळी किनाऱ्यावर येवून पसरते व त्याची भिती वाटते.

नवागावला बदली झाल्यापासून रोज मी वाट बघत इथेच बसते. खरे तर मनात जे मळभ असते ते असतेच फक्त ओहोटीला ते बाहेर येते. तर भरतीला ते दिसत नाही. आज वाटे हा शेवटचाच दिवस, हे वाट पहाणे शेवटचेच, आज तरी नक्की हा प्रश्न सुटेल. पण तसा आशावाद मनात घेवून मी तीन महीने काढते.

प्रश्न सुटायची एक ठराविक वेळ असते. ती येईपर्यंत प्रश्न सुटत नाही. सोडवायचा प्रयत्न केला तरीही तिढा वाढतो, प्रश्न चिघळतो. जखम बरी व्हावी म्हणून औषध घ्यावे तर वावडे. ॲलर्जी येते व त्रास होतो. तसे झाले आहे. ह्या प्रश्नाला उत्तर कधी सापडणार ?

प्रत्येकच ठिकाणी आशा वाटते ही व्यक्ति मदत करेल 'ही' तरी वेगळी व्यक्ति असेल पण या नग्न लोकांच्या समुदायात कपडे घालणारा वेडा ठरावा तसे होते. आपण फारसे कुणाला ओळखूच शकत नाही.

आपले अज्ञान म्हणायचे. कधीतरी कुणीतरी संस्कार केले होते. चांगले वागावे इतरांना मदत करावी, खाल्ल्या मीठाला जागावे, ते संस्कार आज कालबाह्य झाले आहेत का? का ? मुलाला परदेशी जायचे होते.

शेवटी एक दिवस हिय्या करून मुंबईला साहेबाला भेटायला गेले. ''साहेब थोडी रजा हवी होती.''

''अहो, कशाला काम केलेत तुम्ही, नील रिपोर्ट ''काही नाही''चा रिपोर्ट पाठवता आला असता. तुम्ही काम केलेत आता ऑडिट येईल, तुम्हाला रजा देता येणार नाही. काम करायचे कशाला? वेळ काढायचा. या ग्रामीण शाखा अशाच! सर्व सरकारी. नोकर आपण, पगार काही आपल्या परफॉर्मन्सशी लिंक नसतो. भसून वेळ काढायचा. काम करायचे नाही. पण स्पष्ट नाही सुद्धा म्हणायचे नाही. हो, बघतो बघतो म्हणून गप्प बसायचे. काम केले की ऑडीट येते.'' पैकर

माझ्या मनात विचार आला –

१. जर काम केले नाही तर संस्था चालेल कशी?

२. जर काम करायचे नाही तर पगार कशाचा घ्यायचा?

३. यापूर्वी ही गोष्ट मला का सांगितली नाही?

४. उच्च पदस्थ काम न करताच वरच्या जागांवर येतात का?

नकारघंटा ऐकून नाराजीत फाटलेली धरणी असे मन असताना मोनाली दिसली. ती खूष होती. पैकरने तिला मनासारखी शाखा दिली होती.

काही क्षणांच्या आठवणीवर माणूस आयुष्य काढतो. नंतर त्या क्षणांची सावली सुद्धा लपवतो. खरे तर या जगात, संस्थेत किती लबाड असतात लोक? ते आपल्यालाच का भेटतात?

ती माझ्या गाडीतून यायची पण ऊन लागते म्हणून चांगल्या बाजूला बसायची, दारापर्यंत सोडायला लावायची. इतकी सेवा घेवूनही ''पूर्वीचा मॅनेजर तीन वाजता जावू देत होता'' म्हणून मला टोमणे मारायची. बायकांचे, बायकांशी पटणे अवघड असतेच! त्यात अशा लबाड असल्यावर काय विचारता? ती सारखी जुन्या मॅनेजरची स्तुती करते हे मला खटकते? की ती माझ्या विरुद्ध तक्रार करणाऱ्या एका दुसऱ्या ग्राहकाला अधिक भाव देते हे खटकते? ज्या माणसाने माझ्याविरुद्ध तक्रार केली त्याला हीने का बढावा द्यावा? त्याने हीच्याविरुद्ध तक्रार करू नये म्हणून? की ही सुद्धा श्री क्ष प्रमाणे काही परसेंटेज घेत होती? Third party business चा वाटा बंद झाला म्हणून माझा राग असेल का? साहेबसुद्धा त्याच माळेतील असू शकतो? कला मला बघून हसली. ''तिला कुठलेच काम करायचे नसते पण भाव असा आणायचा की विचारु नका!'' ceuee Reliever येईपर्यंत सुट्टीसाठी सोडता येत नाही. मला सुद्धा शारीरिक बळ नाही की मनुष्यबळ नाही.'' मी शरीरानेही थकू लागले, खचू लागले. देवाला प्रार्थना करू लागले.

इतनी शक्ति हमें देना दाता,

मन का विश्वास कमजोर हो ना!

सक्रिय सज्जन उद्बोधन करतो. समाज जागृत करतो. पण इथे सज्जन कोण आहे? सगळ्यांचेच स्वभाव विचित्र वाटतात; अंगावर येणारे कधी गुपचूपपणे सुरा खुपसणार, डिप्लोमॅटिक! कधी गोड बोलतील, कधी खेकसतील, कधी डंख मारतील, मतलबासाठी कुणालाही खड्ड्यात घालतील आणि इतरांचे प्रश्न दुर्लक्षित करतील. लबाड, ढोंगी पण देव माणसाचा आव आणून वावरणारे. दुनियादारी मला कधी कळलीच नाही.

मी माझ्या चांगुलपणाच्या चष्म्यातून जग बघत राहीले. लोलकातील वेगळी किरणे मला कळलीच नाही.

मुंबईहून पुन्हा अलिबागला जाताना पात्रुदेवीची पूजा करायला थांबले.

अलिबागला जाताना कार्लेखिंडीत पात्रुदेवीचे मंदिर आहे. हसरी मूर्ति व आशिर्वाद देणारी नजर व निसर्गरम्य परिसर बघून जीव सुखावतो. चैत्र व अश्विन महिन्यात या मंदिरात विशेष गर्दी असते. त्या देवळात पायरीवर सोप्यावर बसल्यावर माझ्या मनात विचार आला'' पात्र असणाऱ्यांनाच यश मिळते मिळावे म्हणून देवीचे नाव पात्रुदेवी असावे का?'' आयुष्यात किती पात्र व्यक्तींना यश मिळते? Sucess is a chance हे सत्य पूर्वजांनाही कळले असावे का?

कार्ले खिंडीत एक बुजुर्ग देवळात सांगू लागला, ह्या मागच्या दरीतील रस्त्याने कल्याणला, जाण्याचा जवळचा रस्ता आहे. एका गुराख्याला तो माहीत होता व त्याने एका प्रवाशाला सांगितला पण त्या गुराख्याने तो रस्ता इतरांना दाखवू नये म्हणून त्याचे पाय तोडण्यात आले. ताजमहाल रचणाऱ्या कारागिरांनी पुन्हा तशी अजरामर कलाकृती पुन्हा बनवू नये म्हणून ताजमहालातील कढाई करणाऱ्यांचे हात तोडण्यात आले. लक्ष्मीने घर सोडून जावू नये म्हणून पांगळी लक्ष्मीची मूर्ती घरी ठेवण्याची पद्धती काही (क्वचित) घरी आहे. पात्रुदेवीच्या मंदिरात एक भाबडेसे वलय आनंद देवून जाते. पूर्वी पात्रुदेवीच्या मंदिराभोवती काकडीचे वेल, कोकम, कलिंगडांचे वेल, नारळाची झाडे खूप घनदाट होती व दरीतून वर येणाऱ्या वाटसरूला थंडावा मिळत असे. खाली दाट झाडीचे अरण्य होते. अगदी १९८८ मध्ये मी सुद्धा त्या ठिकाणी वाघ पाहिला होता. म्हणजे श्वापदांचा वावर असावा, इतके ते जंगल दाट होते. वाटसरूना विसावा व

अपरात्री भिती वाटू नये म्हणून एखाद्या देवाचे बैठे मंदिर हा पूर्वापार पद्धतीचा जामानिमा येथे आढळतो. जवळपासचा थंडावा व वनस्पतींची पाने व हिरवीगार वनराई बघता जवळपास एखादा झरा किंवा विहीरही असावी. पात्रुदेवी नवसाला पावते असा भक्तांचा विश्वास आहे.

पर्यटनाच्या नकाशात अलिबागचे, रायगड जिल्ह्याचे अतोनात महत्त्व आहे. निळा समुद्र, मुंबईच्या जवळ असणे या कारणाने व कुलाबा किल्ला, मुरुड जंजिरा यांच्यामुळे आपण अलिबागला आनंद प्राप्तीला जातो. त्या साध्या भोळ्या माणसांमध्ये रमतो. चेष्टामस्करीचा निखळ आनंद घेतो. रायगड जिल्हा सर्वत्रच रम्य. साध्यासुध्या माणसांनी आनंदात कसे जगावे हा संदेश देत असतो. पात्रुदेवीची कृपा छाया रायगडावर अशीच राहू दे!

## अलिबाग आणि चाळीसचोर

अलिबाग हे नाव तसे नवाबी थाटाचे वाटले तरी, नावात जे आहे ते गावात नाही. गाव अगदी साधासुधा आहे. ''कोकणची माणसे साधीभोळी, काळजात त्यांच्या भरली शहाळी'' अशी साधी माणसे आहेत. ३०० वर्षे जुने हे गाव छोटेसेच आहे. मुंबईपासून अवघ्या १३० किमीवरील हे लालमातीचे कोकणी गाव पर्यटनक्षेत्रात चांगलेच प्रसिद्ध आहे. पण हळूहळू अलिबागचे महत्त्व महाराष्ट्रभर कळले. बरीचशी पर्यटनस्थळे पर्यटनाचा तणाव देतात पण पर्यटनाचा आनंद देवून, भेट देणाऱ्याची तणावमुक्त करीत नाहीत. अलिबागबद्दल मात्र खात्रीने हे सांगते. कॅटॅ मरीनने बोटीने मजेत पोहोचता येते. अलिबाबाच्या गोष्टींत जशी ''अलिबाबाची दासी मर्जिना'' असते तशी इथे आनंदाची उर्मी मर्जी सर्वत्र साथ देते. खजिना भरलेली गुहा, जादुभरी गरी, ऐतिहासिक थाटमाट सर्वांचे भन्नाट कोलाज म्हणजे अलिबाग होय. चाळीस रांजणांमध्ये चाळीस चोर लपलेले असता तसे इथे चाळीस पर्यटनस्थळांमध्ये चाळीस चोर आहेत. मात्र हे चित्तचोर आहेत! म्हणजे तुमचे मन चोरणारे चोर आहेत.

१) चोर नंबर एक म्हणजे सागर सरांचे सराव वर्ग होय. हो अलिबागच्या या सागरसरांच्या सराव वर्गात तुम्ही जे काही शिकू इच्छिता ते शिकवले जाते. उदा. संगीत, चित्रकला तणावमुक्ती! म्हणजे बघा या सागर सरांच्या येथील लाटांच्या आवाजाने त्या लयीने दीडदा-दीडदा आवाज करणारी सतार आठवते. वेगवेगळी लयबद्ध गाणी आठवतात. सरदार कान्होजी आंग्रेंच्या या गावात समुद्र शांत आहे. उदा. मन, जिथे सागरा धरणी मिळते तिथे तुझी मी वाट पहाते, म्हणते.

निळा समुद्र त्याचे करडे काठ, काळा किल्ला त्याला हिरवी मखमली झालर तुम्हाला चित्रकला शिकवते. ‘‘सागर सर म्हणजे समुद्र बरे का. समुद्रकिनारी वाळूचा किल्ला करताना बालपणीची दिवाळी आठवते. समुद्र किनारी रोज वेगळा दिसणारा समुद्र जीवनकला किंवा तर्कसास्त्र शिकवतो. उदा. भरती ओहोटी हे जीवनाचे सत्यच आहे, हे समुद्र शिकवतो. जे शिकू इच्छित असाल ते शिकायचे व अंधार पडू लागला की परत स्वगृही जायचे. ‘शिवरायांचा आठवावा प्रताप’ असे शौर्य ज्या किल्ल्यात पुन्हा स्मरणात येते तो किल्ले अलिबाग समुद्राच्या आत आहे. सरदार कान्होजी आंग्रे शिवाजी महाराजांचे आरमार प्रमुख होते.

२) चोर नंबर दोन : कुलाबा अलिबाग किल्ला

समुद्राच्या आत सर्व बाजूंनी पाण्याने वेढलेला हा किल्ला हा एक ऐतिहासिक ठेवा आहे. समुद्राच्या लाटा या किल्ल्याचे पाय धुतात. आत गणपति, हनुमान, श्री शंकर यांची मंदिरे आहेत. पांढरी देवचाफ्याची झाडे आहेत. विशेष म्हणजे गोड पाण्याची विहीर आहे. एक ऐतिहासिक तोफ या भव्य किल्ल्याच्या तटबंदीवर ठेवली आहे. १६८० सालात गेल्यासारखे वाटते. या किल्ल्यात जाण्यासाठी भरतीची वेळ टाळून फक्त ओहोटीच्या वेळी टांग्याने किंवा चालत जाता येते. भरतीचे पाणी चढू लागले तर किल्ल्यात मुक्कामाला रहावे लागते. समुद्र किनारी भरती ओहोटीच्या वेळा दिल्या आहेत. त्या बघून सुरक्षितपणे किल्ला दर्शन घेऊन यावे. अरबी समुद्राचे विशाल रुप बघून जरुर या. किनाऱ्यांचे गाव असेच वर्णन अलिबागचे होईल.

३) चोर नंबर तीन : मुरुड जंजिरा

मुरुड जंजिरा या किल्ल्यांची भेटसुद्धा चित्त चोरणारीच असते.

४) चोर नंबर चार : हिराकोट, सर्जेकोट, वर्सोली रेवदंडा, सागावचे सुरुचे बन व लांब वर पसरलेला समुद्र किनारा हे मन चोरून नेतात. खूप गर्दी नाही. बाजार नाही, फक्त निसर्ग. पक्षीच पक्षी रंगीबेरंगी व गोड!

५) बाकीचे ३६ चोर सांगू? करमरकरांचे म्युझियममधील सुंदर मूर्ति, कनकेश्वर, बिर्ला मंदिर, माढवा बीच, दत्त मंदिर, शंकराची वेगवेगळी देवळे, नानासाहेब धर्माधिकारी यांचे स्मरणतीर्थ, बहीरादेवीचे मंदीर (मी नेमीच लिहिते ना देव बहिरा आहे. पूर्वी कुणीतरी हाच अनुभव घेवून हे देऊळ बांधले असावे) उसरचे गेल पार्क अलिबागची मासोळी, पापलेट, बोंबील, सोडे, झणझणीस रस्से खवैय्यांना आवडतात. शाकाहारींसाठी फणस, पोहे, पोह्याचे पापड, उकडीचे मोदक, कर्टुल्यांची भाजी, सुरणाचे काप, शेवग्याच्या शेंगांची आमटी हे पदार्थ असतात. मेतकूट भात, कोकम सरबत सुद्धा आवडेल.

अलिबागचे हे चाळीस चोर नक्कीच तुमचे चित्त हरुन नेतील अर्थात चोर शब्द चित्तचोर या अर्थाने वापरत आहे. प्रेमाने आपण लहान बाळालासुद्धा चोर म्हणतो ना, अगदी तसेच समजा!

इथले माडसुद्धा सांगतात, ‘‘आमच्या अलिबागला कधी येता? गेल, विक्रम इस्पात, आरसीएस येथे काम काढून या! फक्त दोनशे रुपयात सहल होईल.’’

मी नातेवाईकांकडे राहीले. ते लोक खूप चांगले होते, मात्र घर अति स्वच्छ होते व मलाच त्यात आपण उपरे आहोत असे वाटत असे. आश्रिताची भावना मनात येत असे. त्या कुटुंबाचे त्यांचे त्यांचे काही खाजगी प्रश्न होते, जे त्यांना माझ्यासमोर बोलता येत नव्हते. शिवाय ११ ते ५ च

बाहेर राहणारी मी उरलेला वेळ घरीच काढावा लागे. मी तेव्हाच भाड्याने फ्लॅट घ्यायला हवा होता. पदोन्नतीवर दूर दूर फेकणाऱ्या दीडशहाण्या व्यवस्थापनाला निदान निवासी घरे, क्वार्टर्स तरी बांधण्याची अक्कल असती तर बरे झाले असते. भावना बोथट करून, अलिप्त अशा या ॲपॅथिक जगात मी राहू शकत होते. पण एका क्षणी मी ती नोकरी सोडण्याचा निर्णय घेतला. त्या निर्णयावर फेरविचार करायला मला १० महिने संधी होती. पण त्यावेळी त्या गावातून, त्या संस्थेतून त्या निष्क्रिय लोकांतून बाहेर पडणे ही एकच प्राथमिकता होती. निष्क्रियतामय बनून, काम न करून, वेळ काढून, मी राहू शकले नाही, ते माझे संस्कार नव्हते.

संस्थेतील नोकरी, केशरी दुधाने भरलेले पातेले अशी ६०००० पगार देणारी होती. मी ते केशरी दुधाचे पातेले टाकले तेव्हा टीका झाली. पण गोष्टी मागची गोष्ट मी आज तुम्हाला सांगणार आहे. खूप वर्षांपूर्वी कोणा एका पूर्वजाने स्थापन केलेली ही संस्था मी आज नातेबंद केली आहे. हो मला वाईट वाटले. सर्वत्र दीपोत्सव असताना विद्युत रोशनाई असताना माझा लामणदिवा ती सांजवात सर्वांनाच नकोशी होती. विविध कंपन्या, फॅक्टरी मिल उघडणे व बंद होणे नवीन नसते. नवीन दुकाने उघडतात, चालत नाहीत म्हणून बंद होतात. तशीच ही सुद्धा असेल असे समजून कुणी फारसे लक्ष देत नाही. कामगार पैसे घेवून निघून गेले, बाबू लोक निष्क्रियपणे दुसऱ्या नोकरीत गेले. एक काळ असा होता बाबू लोक मान मोडून काम करीत असत. आता काळ असा आला... कार्यालयीन संस्कृती विचित्रच असते. निसर्गरम्य कोकणातील हे प्रदूषण आहे का ?

सर्व संकटांचा दोष शत्रूवर देता येत नाही. काही संकटांमध्ये insider hand आतला हातसुद्धा असतो.

आपले कालबाह्य संस्कार अपयश देतात. जसा रानपिंगळा हा राष्ट्रीय पक्षी ठरवल्याबरोबर त्याचे अद्‌भुतत्व सर्वांना आठवले, तसे माझे नाव घेताच मी अतिसामान्य वाटते. मी एखादी गोष्ट मागितली की जणू काही आम्ही भीक मागतो अशी वागणूक दिली जाई. डोळे मिटून झोपल्याचे नाटक करणाऱ्यांना कसे उठवणार? जी नाती आता पूर्णपणे खराब झाली ती कधीही सुधारणे शक्यच नव्हते. रक्ताला चटावलेले वाघाप्रमाणे प्रशासकीय व आस्थापना अधिकारी माझ्याच रंज रक्ताला चटावले होते. काही बोलून सांगून उपयोग नव्हता. विश्वास, श्रद्धा, भाबडेपणा संपू लागला. नसलेली खाती माझ्या नावावर टाकली गेली. माझ्या नावाने पावत्या फाडल्या.

सुविचार पुस्तकातच शोभावे अशी परिस्थिती होती. चारचौघांसारखे साधे आयुष्य हवे होते. पण ते शक्य नव्हते. बंडाचा झेंडा घेवून झाशीची राणी होणे जमले नाही. तुम्ही बोलू शकता पण थोडक्यात बोला, असे सांगता येते पण माझी बाजू ऐकून न घेता Don't argue चा दम दिला जाई. माझी बाजू कुणीही कधी ऐकून घेतली नाही. मी नावाचीच मॅनेजर होते.

टार्गेट पुरे करणे हे माझेच कर्तव्य होते. असा अविर्भाव कर्मचाऱ्यांत रुजला होता. Oyster pearl म्हणून एक मोती असतो. त्या शिंपल्यातील एक मासा स्वतःभोवती एक आवरण बनवतो. त्या माशाला जेवढा त्रास होतो, तेवढा तो द्रावण सोडतो व या द्रावणापासून बनणारे मोती अधिक तेजत्वी होतात. मला स्वतःला ऑयस्टर पर्ल झाल्यासारखे वाटत होते. कस्तुरी पक्षीण म्हणे वेदना सहन झाल्या नाही की तिची पिसे खाली फेकते आणि ती रंगीत पिसे मिळावी म्हणून तिला अजून त्रास दिला जातो.

या संस्थेवर १०० वर्षांपूर्वी कुठला सूर्य तळपत होता मात्र आता ती उन्हे कलली होती. चांगले लोक आहेत पण त्यांच्या हातात सत्ता नाही किंवा ते उदासीन आहेत. वाईटांनी कमरेचे सोडून डोक्याला बांधले आहेत व इतर दुर्लक्ष करीत आहेत. बदलाची आशाही कुणाला उरली नाही. दुःख विसरण्यासाठी दारू ढोसावी तशीच करमणूकीची व या उदासीनतेची नशा सर्वांना चढली आहे. अपघात प्रसंगी फोटो काढणारे अपघातग्रस्तांना मदत करतात का? फोटोच काढतात का? एकदा कंपनीच्या दारातच माझ्या गाडीचे चाक चिखलात रुतले. बरेचजण गंमत बघत होते. पुढे कुणीच आले नाही. पावसात चिखलात मीच उतरले तेव्हा माझे हसे झाले.

एक चांगली व्यक्ति हरली की ही हार तिची वैयक्तिक नसते.

निर्बल से लढाई बलवान की, ये कहानी है दिये की और तूफान की।

ही हार पूर्ण समाजाची असते. अगदी क्षूद्र व्यक्तिसुद्धा इतरांबद्दल गॉसिप करतात. भुरटे गुन्हे करण्यात हे लोक तरबेज असतात. फुटपाथवरचे अनधिकृत फेरीवाले सुद्धा मुजोर होतात. बायकांची छेडछाड करतात.

चांगली माणसे तिरप्या उन्हाकडे दुर्लक्ष का करतात?

चिंध्या झालेल्या अस्मितेकडे

ते निर्विकारपणे पाहतात

चांगली माणसे हरवतात

कर्तव्य करायचे टाळतात

प्रश्न सोडवणे टाळतात

सत्काराच्या फिलगुडवर खूष राहतात.

नदीच्या काठावर सूर्यास्ताला

इंद्र धनुष्याला बाणाचे टोक असते

निळ्या चांदरातीत

ज्यांच्या आठवणींना ते सलते

कविता दुःख सुंदर करते

पाकळीमध्ये खोलात

चांदण्याच्या कुपीत

वेदना लपून राहते, रात्र जागेपणी सरते

नवागाव व अलिबाग अनोळखी गाव होते, पण कृष्णासारखे विषारी लोक नव्हते किंवा अजून ते अनोळखी होते. आपल्या गावी त्या भितीदायक जागा माहीत असतात. परक्या जागी भितीदायक गोष्टी कधीही सामोऱ्या येतात.

अनजानी राह, वळणाच्या पुढे काय, पाणवठ्याच्या आधी काय? काहीसे हरवलेले भाव, वर्दळीच्या दिवसाच्या आठवणी जुने फुरसत के रात-दिन आठवतात. संध्याकाळी मला वेगवेगळे सुंदर पक्षी दिसत असत. मात्र 'न' मिळणाऱ्या अस्तित्वात आहे की नाही हे सुद्धा माहीत नसलेल्या त्या अप्राप्य कस्तुरीपक्षाचे मला वेड लागणे ही व्याधीच म्हणायची! स्वप्नांच्या मागे धावण्याचा मनोरोग होय. कुणालाही गृहीत धरता येत नाही. प्रत्येकच प्राणी पक्षी व्यक्ती स्वतःच्या मनाप्रमाणे वागते. जेव्हा आपली तीव्र इच्छा होते, तेव्हाच कस्तुरीपक्षी दिसतो. रेंगाळणाऱ्या संधिप्रकाशात तो बेलाच्या पानासारखा दिसतो, कदाचित हसतो. अशुभ विचार सामोरे दिसून ही मी बघून न बघितल्यासारखे केले. पक्ष्यांना पंख थकले म्हणून थांबता येतेच असे नाही. थांबतो तो संपतो. म्हणून पळतो, तो तहानेने मरुही शकतो. निलकंठ पक्षी निळ्या मानेचा, नीलवर्ण पूर्ण निळा. सूर्यपक्षी पिवळा धम्मक, मकाऊ रंगीत, पण त्यांना उडावेच लागते. पोटासाठी धडपड करावीच लागते.

पिवळ्या पंखाचा पक्षी नाव सांगेना

लाल चोचीचा साळुंकी दिसेना

कोकिळेची कुहू कानी पडेना।।१।।

काळ्या पक्ष्याला पांढरे पंख खुलेना

पांढरी चिमणी दाणे काही टिपीना

खंड्या दिसल्यावाचून लेखणी बोलेना

गाव रानातली शीळ कानी पडेना।।२।।

पावश्याची पीहीपीही थांबेना

कावळ्याचा शकुन मला समजेना

भारद्वाजाचा डौल मला रुचेना

कबुतराचे गुटर्गु मला सोसेना।।३।।

मना आणि बुलबुल मला भावेना

कस्तुरी राजाची ओढ घटेना

लालपंखांचा भरारी थांबेना।।४।।

पक्षीसुद्धा किती प्रकारचे? मुठीत मावतील एवढे छोटे पण कल्ला करून आकाश पाताळ एक करतील एवढा मोठा आवाज असलेले! काही पानांच्या मागे बेमालूमपणे दडू शकतील अशा रंगाचे, तर काही कुठेही उठून दिसतील अशा रंगपंचमीचे होते. काही सारस पक्ष्यासारखे ७

फूट उंचीचेही असतात. शहामृगसुद्धा पक्षीच असतो. लहानसा शक्कर खोप्या फुलांमधील मध पितो, त्याला फुलचोख्याही म्हणतात.

''शाम ढले खिड़की तले तुम सीटी बजाना छोड़ दो'' असे पक्षी असतातच पण एवढ्या भगभग उन्हात, आडेही दुपारची वामकुक्षी घेत असताना, हा कोणता पक्षी शीळ घालतोय? मी उन्हात धापा टाकत जंगल तुडवू लागले. एकटीला जाणे कंटाळवाणे होते. डोळ्यातले अश्रू लपवून, सखीची आठवण काढत मी पुढे जात होते. सखीला काय कित्येक मैत्रिणी भेटतील. ती माझ्यासाठी रडणार नाही.

कधी काळी छंद होता

तारका वेचण्याचा

निळाईचा ध्यास होता

स्वप्नवेड्या लोचनांना

दूरचा तो एक तारा

साथ होता चालताना

अमृताचा सूर होता

आसवांना कल्पनांना

माझ्याबरोबर नोकरी करताना सोबत असलेल्या एका ग्रुपची आठवण आली. कृष्णाचे पत्र आले. तुला लिहिलेले हे शेवटचे पत्र. तुला मी सांगणारच होते. बदली हवीचे पत्र लिहू नको. तूही रडशील व मलाही रडवशील. तुझ्या त्या कस्तुरीपक्ष्याच्या ध्यासापायी! तुझे कस्तुरीवेड अजूनही संपले नाही. अगं पक्ष्यासारखा पक्षी असतो. कावळा काय आणि कस्तुरी काय? त्या रंगीत पंखांचे काय एवढे कौतुक करायचे.

I thought all was over, But it still continues

I thought you have forgotten, But you still miss it

At night when darkness evades every world

On barren land of mind the memories whirl

Like a blast of wind, upsetting all balance

My life in fence could note recover from it all

Life is like a place when smoke rises from marsh

Broken dreams form scars wetted with tears

A deep unknown barren, valley or canon or hill

Smoke rolling every where & flames in Pinewood

That bird comes & goes to spoil my settled case

संसार सांभाळ, नवरा सांभाळ हे वेड सोडून दे अशी कळकळीची विनंती या मित्राने केली होती. हा मित्र कृष्णा वरकरणी सरळ वाटत असे, दाखवत असे. तसा प्रत्यक्षात नव्हता. कस्तुरबेला ह्याने त्रास दिला होता पैकर इतकाच. मला आरोपपत्र देण्यात त्याचाच हात असे.

कृष्णा खूप विषारी होता. नक्की काय झाले विचारले तरीही तो 'मला माहीत नाही' म्हणत असे. त्याचे इनिशीयल असे, तो त्यात साक्षीदार होता पण ''माहीत नाही'' सांगत असे. त्याला पैकरबद्दल Soft Corner होता. पैकरने संधी मिळताच कृष्णाला त्याच्या CO ला ओढले. दुष्ट माणसांची साखळी मजबूत होती. तो फास ते दोर माझ्या गळ्या भोवती आवळत होता. साक्षीदारांकडून खोटे लिहून घेतले आणि पैकरने सगळ्यांची बदली केली. आपले मोहोरे सुरक्षित केले. पैकर दुष्ट होता की कृष्णाच्या सांगण्याने वागत होता? की दोघेही संगनमतात वागत होते? का? सुकी ते सुखी. भावहीन लोक सुखी होतात. कामत आळीत नाग गणपतीच्या देवळात बसलेली असताना पळापळ सुरू झाली. मधमाशांचे पोळे वजनाने खाली पडल्याने मधमाशा सर्वत्र पसरल्या होत्या. एक वृद्धा दंशाने विष पसरून मृत्यु पावली.

देवळात दर्शनाला गेल्यावर हा प्रसाद मिळावा? मध जमवणाऱ्या मधमाशा अशा विषारी? सर्व मार्गानी पैसे गोळा करणारा पैकर इतका डंख मारणारा, दुसऱ्याचे रेकॉर्ड खराब करणारा? माऊस पकडता येत नाही आणि याला GM व्हायचे होते. आणि इतर? थातुरमातुर

नियम लावून इतरांचे नुकसान करण्यात तो माहीर होता. ‘‘आपण पुन्हा असे पत्र लिहू नये’’ असेही खडे बोल पैकरने सुनावले होते. मुस्कटदाबी करण्यात ती संस्था श्रेष्ठच होती. किती कर्मचारी बदलणार? वारसाच जर राजा पैकर सारख्यांचा असेल तर? मी सखीबरोबर फोनवर चर्चा करीत असे.

‘‘मी कुणाचे ही काही बिघडवले नाही’’ – मी

‘‘त्यांचा अवैध पैसे कमवायचा मार्ग बंद केलास, त्यांच्या शेपटीवर पाय दिलास तू’’ – सखी

‘‘कमाई त्यांनी करून माझ्या बळी दिला असता’’ – मी

‘‘सर्व अ-महाराष्ट्रीयांनी तुला कोंडीत पकडले’’ – सखी

‘‘मला नाहक बदनाम केले’’ – मी

‘‘बदनाम नहीं होते हैं जिनके नाम होते हैं’’ – सखी

‘‘देवा सांग तू आहे का?’’ – मी

‘‘दुनिया बनवताना का तू असे सॅम्पल बनवले’’ – सखी

‘‘मी फुलराणी नाही पण या फुलांच्या गंधकोशीचा नवरंगायतनाचा गंध घेणारी आहे. मोती वेचणारी, तेजस्वी विचार मांडणारी, मात्र मला हे लोक दंश का करतात?’’ –मी

''लिखाणाची ऊर्जा आतून येते. लिहू म्हणून कुणी लिहू शकत नाही, तुला हे धन मिळाले आहे. परमेश्वराने तुला काही वेगळे करायला जन्माला घातले आहे'' – सखी

''मला डिग्रीचे वेड नव्हते. मला लिखाणासाठी संशोधन करायचे होते.'' – मी

सखी मला नेहमी प्रमाणे म्हणाली, ''नोकरी सोड.''

''मी वेळ कसा घालवू ? नंतर काय करणार'' –मी

''माणूस जवळ असले की आपल्याला त्याची किंमत नसते.'' – सखी

''तसे पक्ष्यांमध्येही असावे. एक कुरकऱ्या पक्षी 'हो' अशी ओरड करायचा. जणू तो कुणाशी भांडत असावा. हो तुम्हीच मला त्रास देता. मात्र जेव्हा तो पक्षी खाली पडला होता तेव्हा बाकीचे पक्षी झाडावर कोंडाळे करून ओरडत होते. मला तो कुरकुऱ्या पक्षी कस्तुरी पक्ष्याच्या जातकुळीचा वाटत असे.'' – मी

माझा रोजचाच रस्ता किती जवळचा होता. मात्र आज मला त्या रस्त्यांबद्दल, त्या झाडांबद्दल काहीच वाटत नव्हते व काही भावनासुद्धा निर्माण होत नव्हती. कधी कधी माणूस एकदम कोरडाच होतो, कोणतीच गोष्ट आतपर्यंत पोहोचतच नाही. साळुंक्यांचा थवा होता. एक साळुंकी 'संवेदना, दोन साळुंक्या वेदना, तीन साळुंक्या पत्रद, चार साळुंक्या मित्रद, ''एक बैल घाण्याला जुंपलेला असतो. काही वर्षांनी त्याला घाण्यापासून बाजुला करतात पण बैलाला कायम वाटते 'जू' मानेवर आहे व घाण्याभोवती फिरायचे आहे. शेवटी तो स्वतः भोवतीच फिरू लागतो. माणसालाच मानेवर जू हवे असते. त्याच त्या चाकोरीत फिरायचे असते व घाण्याची सवय झालेली असते.''

सखी गोष्ट सांगू लागली, फोन कट झाला. बस स्टॉप पुढे चालत जातांना, रात्र झाली. एक गारुडी, पुंगीवाला झाडाखाली बसला होता. म्हणाला ''मी कस्तुरी पक्ष्याचे घरटे दाखवीन मात्र तिथे त्या गुहेत तो खजिना असेल तो मी घेणार. सोने माणिक हीरे असा ऐतिहासकालीन खजिना त्या तिथे आहे. डोंगर उंच होता, पायवाट होती.''

''चालेल पण जीवाला धोका नाही ना!'' – मी

''नाही, मी पुढे होईन तुम्ही मागे व्हायचे.'' – पुंगीवाला

गुंफेच्या डोंगरावरून आत गेलो. मला दम लागत होता. पुंगीवाला तुरतुर वर चढला, बोगद्याच्या आत गेला. मी खूप थकले होते. थोडी मागे रेंगाळले. एका ठिकाणी पुंगीवाला बसला होता, आत अंधार होता.

''मला तोंडात रक्तासारखी चव लागते आहे'' – पुंगीवाला

मी त्याच्या तोंडावर टॉर्च मारला. त्याच्या नाका तोंडातून कानातून रक्त वहात होते. हवेचा दाब कमी व ऑक्सिजन कमी होता. त्यामुळे त्याला रक्तवाहिन्या फुटून त्रास होत होता. पुंगीवाल्याला खेचत मी गुंफेच्या तोंडाशी आणले व धापा टाकत बसले. रात्र झाली होती. पुंगीवाला दोन-तीन तास बेशुद्ध होता. नंतर मी त्याला हाताला धरून खाली आणले.

अंधार मी म्हणत होता. त्या डोंगरावर जंगली जनावर होता असे म्हणत असत. वर गुंफेच्या दाराकडे पाव बिस्कीटे खारी विकणारा लुंगीवाला पाहिला, कुणाचे तरी डोळेच चमकत होते. मांजर असावी किंवा मांजर मावशीचा भाचा वाघ असावा.

हात जोडून, पुंगीवाला मला हाताने ‘जा’ अशा खुणा करू लागला. मी घराकडे जाताना, पुंगीवाल्याच्या खोलीत, पुंगीवाला डोंगराच्या पायथ्याशी बेशुद्ध दिसला असे सांगितले. ते गावकरी आरडाओरडा करीत डोंगराच्या दिशेने गेले. त्यांनी पुंगीवाल्याला खाली आणून औषधोपचार केल्याचे समजले. पण पुंगीवाला मला पुन्हा दिसला नाही. भेटला नाही. त्याने खजिन्याचा नाद सोडला असावा. कस्तुरी पक्षीण नावडतीच होती. भारद्वाजाला शुभ शकुन मानतात, पण कस्तुरीला मात्र अशुभ! हा ठसा बसला. मी मात्र कस्तुरी पक्ष्याचा नाद सोडायला तयार नव्हते. कृष्णा वारंवार मला प्रेमाने आर्जवाने, धमक्या देऊन माझा कस्तुरीपक्षी हा संशोधन कार्यप्रस्ताव बंद करावा सांगत असे.

एक दिवस तो मला नवागावला भेटायला आला. शाखेत खूप काम होते व गर्दीही होती. त्याचा हेतू कळत नव्हता.

‘‘आमच्या तामीळ लोकांत त्या पक्ष्यांच्या नावाने संदेश दिला की इच्छा पूर्ण होते. आपल्याला त्रास दिलेले लोक अल्पायुषी होतात. तू त्यासाठी या जंगलात येऊन राहीलीस का?’’ – कृष्णा

‘‘छे मी मनाने संस्था सोडून कधीच बाहेर पडले. मला त्या आठवणीने सुद्धा हजारो इंगळ्यांनी दंश केल्याच्या वेदना होतात.’’ – मी

‘‘तू तसे केल्यास आम्ही तुझ्या मृत्यू व्हावा म्हणून चक्र पूजा घालू. कस्तुरबेला बरीच माणसे त्या शास्त्रात निपुण आहेत.’’ – कृष्णा

त्याच्या हातात रक्तचंदनाची एक भितीदायक बाहुली होती.

''नाही माझ्या मनात तसे नाही.'' – मी.

दिवसभर मला कोण भेटते, फोन करते याचे निरीक्षण करून संध्याकाळी गाडी पकडून कृष्णा गेला. त्याला माझे उत्तर खरे वाटले असावे किंवा तो फक्त धमकी द्यायलाच आला असावा.

मित्र वेगळे व ओळखीचे वेगळे, अनोळखीचे अजून वेगळे असतात. संकटकाळी धावून येतात तेच मित्र! बाकीचे ओळखीचे असतात. खरेतर त्यांना आपण ओळखलेलेच नसते. कृष्णाला त्याच्या घरचे सुद्धा ओळखू शकले नसतील. कृष्णा, गुप्ता, अर्रन्, असे मराठी माणसांना हाकलून त्यांचे राज्य वसवत होते. दोन दिवसांनी कृष्णाने पुन्हा फोन केला. तो म्हणाला ''शिवडीला मुंबईला कितीतरी फ्लेमिंगो पक्षी येतात. त्यांचा अभ्यास कर, माळशेज घाटात सारस पक्षी येतात तिथे अभ्यास कर. कस्तुरीपक्षी अशुभ असतो. कस्तुरी पक्षीणीला इतर पक्षी वाळीत टाकतात व ती चोच उघडी करून पोटवर करून पाण्याअभावी तडफडून उन्हाळ्याची दाहकता सहन न होवून मरते. तुझ्यावर ती वेळ येईल.''

''माझे मी बघीन.'' – मी

''एकच पक्षीण असते पण पाण्यातील प्रतिबिंबावर प्रेम करते. स्वतःचेच दूसरे रुप ठरवते. वेगवेगळे दोन आवाज काढते. म्हणून इतरांना वाटते जोडी आहे, पण एकच पक्षी असतो.'' – कृष्णा

मी हो-हो केले. दुसऱ्या दिवशी मला कस्तुरी राजाची शीळ ऐकू येतेय असे वाटले.

हवा मळभ दाटलेली होती, पाऊस परवडला पण असे मळभ आले की अशुभच वाटते. दारावर टकटक झाली. हल्ली मी घाबरायलाच लागले होते. त्या गावी मी एकटी राहते. मी कस्तुरी पक्षी शोधते हे सर्वदूर पसरले होते. दार उघडले एक भिकारी होता. मी पुन्हा दार लावून आत शुन्यपूर्ण विचारांनी बसले. वाटते परत मुंबईला जावे. बॅग भरायला सुरुवात केली. पुन्हा दार वाजले व पुंगीवाल्यांची हाक आली. एक मुंगुस घेऊन पुंगीवाला व तो भिकारी उभे होते. पुंगीवाल्याचा रंग काळा ठिक्कर पडला होता. पुंगीवाला म्हणाला, ''हा भिकारी तुम्हाला त्या पक्ष्यांजवळ नेईल मात्र बाकी सोने, पैसे मिळाल्यास' त्याचे पक्षी व अंडी तुमची ? उद्या जा.'' - मी बरे म्हणाले.

भिकारी कळकटलेला होता पण त्याला भटकायचा अनुभव होता. या गुहेत काही माणसे मित्रमैत्रिणींना आणतात. काही खूनही इथे झाल्याचे ऐकीवात आहे. एक बाई खूप दागिने घातलेली मित्राबरोबर वर गेली. परत येताना तो एकटाच पायऱ्या उतरून आला. दहा वर्षे झाले पण नक्कीच तिचे दागिने वर त्या गुहेत असतील, भिकारी सांगत होता.

''पक्ष्यांचे काय ? की मला खोटे कारण सांगून नेता आहात.''

''पक्षी इथूनच बघा, हिरवळ आहे, झरा आहे, तलाव आहे. वेडे राघू व साळुंक्या इथूनच दिसताहेत. कपारीत माकडे व खारी दिसताहेत. म्हणजे पक्षी सापडावे अशी जागा तर आहे ना ?'' – भिकारी

''पानथळीपेक्षा डोंगरमाथा कस्तुरी पक्ष्यांना आवडतो.''–मी

‘‘शोधू या’’ भिकारी म्हणाला. मी टॉर्च, दुर्बिण, कॅमेरा स्पॉटिंग, स्क्रोप डायरी घेतली. भिकाऱ्याजवळ दोरखंड, गोणपाट, चाकू, वेताच्या छड्या होत्या. ‘‘मलाच मारुन गोणपाटात भरायचा नाही तर’’ मी मनाशी बोलले.’’

पण आता मागे फिरायला संधी नव्हती. डॉक्टरेटची डिग्री भुरळ घालत होती. शिवाय आता लढायचेच?

देवा नारायणा तुला विनंती फार फार

जन्म बायकांचा नको घालूस वारंवार!

पक्षी शोधणे सोप्पे नसते, ते दडून राहतात.

भिकाऱ्याबरोबर बऱ्याच ठिकाणी शोध घेतला. ‘‘टेकडी पलिकडच्या जलाशयाच्या मागे पडक्या वाड्यात एक एकटा कस्तुरी हेपला जातीचा पक्षी राहतो. त्याला इतर पक्ष्यांनी वाळीत टाकले आहे.’’ भिकारी म्हणाला.

उद्या शोध घेऊ या, आता रात्र झाली म्हणून मी त्याला कटवून हाकलून दिले. तीन कस्तुरी पक्ष्यांत दोन नरपक्ष्यांचा मृत्यू झाल्यावर मादी एकटीच राहते. ही तीच असावी. मधुकर पक्षी सुभग, सुलभ दिसत असत.

पूर्वी कस्तुरीपक्षी ज्योतिष सांगण्यासाठी राजदरबारी पाळले जात असत. ह्यातले काही लाडके पक्षी पकडून विकले जातात. रसिक लोक ते पक्षी लव्हबर्डस म्हणून पाळत. ते

पिंजऱ्याबाहेर येत नाहीत. पिंजऱ्याची सवय होते व स्वातंत्र्याबरोबर विरोध व असुरक्षितता येते ना? पिंजऱ्यातील व झाडांवरील सर्वच पक्ष्यांची आपली एक भाषा असते, जगण्याची पद्धती असते.

ऑफिसच्या माणसांचे पण तसेच होते, ते पिंजऱ्यात खूष होते.

मला त्या संस्थेतून फोन येत, मात्र मला अधिकार नव्हते. सूचनेचे जाणून घेण्याचे टीप्पणीचे! फक्त कधीतरी तिथे होते म्हणून एक प्रकारची अटॅचमेंट म्हणून बोलावेसे वाटे. पण आतल्यांनाच हक्क नव्हता तर बाहेरच्यांना कुठून? छोड़ आये हम वो गलियां म्हणत होते. मात्र त्याच गल्लीत मी रेंगाळत होते.

पक्षीमित्र संघटनेच्या मदतीने भिकाऱ्याच्या सांगण्यानुसार त्या डोंगरमाथ्यावर एक तंबूच ठोकला. वाटेल त्यावेळी पक्षी बघायला जाई. भिकारी पाईप नाले, कपारी येथून माल आणून गोणपाटांत भरी. कधी रात्री ९ नंतर मी खाली घरी जाई. एकदा दुसऱ्या दिवशी मी पहाटे ४ वाजताच आले तेव्हा भिकारी नशा करून पडला होता. बाजुला सांगाडे, दागिने, खरे की खोटे माहीत नाही पण होते. मी रोजच्याच वाटेने पक्षी शोधायला निघाले. एक साधू भेटला. ''धनेश पक्षी, हॉर्नबील, शिक्रा, वॅगटेल खूप दिसतील. मात्र हंस,कस्तुरीपक्षी जोडी-जोडीने राहतात.'' – साधू

''पण Ternate म्हणजे तीन पक्षी यांचा समूह असतो असे विज्ञानात आहे.'' – मी स्कोप लावत म्हणाले.

''त्या कल्पना आहेत. तीन पक्ष्यांमधील एक नर अल्पजीवी ठरतो व कस्तुरीपक्षी त्या मृत नर कस्तुरी राजाच्या आठवणीत झुरतो व मातीत डोके खुपसून शेवटी मृत होतो.'' – साधू

‘‘तुम्ही काहीतरी वेगळे सांगा. त्याच त्या गोष्टी नको.’’ संध्याकाळी परतीच्या पुढच्या वळणावर पैकरची गाडी उभी होती. पैकरने भिकाऱ्याला ५० रु.ची नोट दिली.’’ – मी सुन्न झाले.

भिकारी गेला. ‘‘काहीतरी धातुरमातुर खरेखोटे या विषयावर लिहीलेस तर याद राख. तुला मी असे वागलो हे सांगायला लाज वाटत नाही? निर्लज्ज बाई!’’ पैकर हातात लाकडी नाग नाचवत म्हणाला.

‘‘मला लाज वाटते मी अशा मुर्दाड लोकांच्या संस्थेत काम करते, मला लाज वाटते या संस्थेने तुमच्यासारखे संस्कारहीन पाळले आहेत. मला लाज वाटते. मी स्त्री आहे व मला संरक्षण देण्यात ही संस्था, हा समाज कमी पडतो आहे.’’ – मी

‘‘तुम्ही राजीनामा द्या, निघा संस्थेबाहेर’’ पैकरने माझे लिखाणाचे कागद फेकून दिले. माझी दुर्बीण फेकून दिली. पैकर अद्वा तद्वा बोलत होता. त्याचवेळी भिकारी गावातील, पाच-सहा माणसांना घेऊन आला. ते लोक पैकरला म्हणाले, ‘‘तुम्हाला मार खायचाय का? तुमच्या बायकोशी कोणी असे वागले तर? ती लिहेल अशी भिती वाटते तर तसे वागताना लाज का वाटली नाही?’’ गावकरी पैकरला ओरडू लागले. कमानीजवळ त्याला धक्काबुक्की करू.

पैकर गाडीत बसला. गाडीत कृष्णा होता. लढणाऱ्या व्यक्तीचे कपडे सांभाळायचे काम त्याला चांगलेच जमत होते. त्याच्याकडे वळून गावातील एक अडाणी वाटणारी आजी म्हणाली.

‘‘कधी तरी विचार करा. तिच्याशी कसे चूक वागलात. मरण्यापूर्वी दोन दिवस केलात तरी चालेल.’’

आजीने चुरगळलेले, उडालेले कागद माझ्या हातात दिले. ‘‘खोट्या तक्रारी लिहा असे पैकरच आम्हाला फोनवर सांगे.’’ आनंद म्हणाला. ‘‘कदाचित कांडेलासुद्धा पैकरनेच सांगितले असेल’’ आजी म्हणाली. पैकर गाडीत बसून निघून गेला. माझी ‘जिथे मी जाईन तिथे’ बदनामी करण्यात पैकर यशस्वी झाला होता. तरी बरे, नवागाव हे कस्तुरबे पेक्षा शांत, चांगले होते. माणसे सद्शील होती. तरीही नोकरीचा मी त्याच दिवशी राजीनामा तयार केला. तीन महीन्याची नोटीस देऊन रजा मंजूरीसाठी टाकली. नवागावला, कस्तुरीपक्षी शोधण्याचे आठच दिवस उरले होते. त्यानंतर, मी पुन्हा मुंबईला जाणार होते. कायमचीच, नोकरीला रामराम करून जाणार होते. पैकरने माझे पोट मारले. बाकीच्यांनी स्वतःचे पोट वाचवले.

माझ्यावर नोकरी सोडायची वेळ आणली.

असुरक्षिततेच्या कारणाने मी नोकरी सोडली. पैकर, कृष्णा, श्रीधर, मोनाली, पुनी, अक्षिता, प्रोवी, इतर निरुपद्रवी पण निरुपयोगी, स्थितप्रज्ञ दगडछाप कर्मचारी यांचे बहुमत असे होते. चांगले लोक अल्पमतात पडले हे एकच सत्य आहे. माझ्यावरच पैकरची नजर का पडली ? मी हार का मानली ?

पैकरने माझे पोट मारले. मला संस्था सोडण्याचे ठरवले याचे वाईट वाटते. नाही असे नाही. पण त्रास दिल्याचे वाईट वाटते. अडीअडचणीत सर्वचजण माझी मदत घेत होते. पण संधी मिळताच त्रास देत होते. काही जण मनोरुग्ण होते. त्यांच्या त्या रोगावर इलाज व्हायला हवा.

अन्यथा ही संस्था एखाद्या मोठ्या घटनेने बदनाम होऊ शकते. दहा हजाराचे फ्रीज दान दिले म्हणून वर्तमानपत्रात फोटो छापून त्यांची जाहिरात होत होती, समाजसेवा नव्हे. करमणूकीच्या कार्यक्रमाचा अतिरेक होता. राजाची इंद्रसभा असावी व खुषमस्करे पाळलेले असावे. अशा वर्ख लावलेल्या कठपुतळ्या नाचत होत्या. राग ,अहंकार, आतंकाची साखळी प्रतिक्रिया होती. ते मालक आहेत या संस्थेचे. ही त्यांची संस्था आहे. त्यांना ती बंद करायची असेल तर त्यांची इच्छा? का?

ही या संस्थेची रीत आहे का?

संस्थेत बिनकामाच्या लोकांना बसवून ठेवा खुर्चीवर खुषीत आणि कामाला चांगल्या असणाऱ्यांना दरवाजा दाखवा. किती त्रास देऊ शकतो व दिला जाऊ नये ते इथे कळले. माझ्याच नावाची खराबी होऊ नये म्हणून मी महिला आयोगाकडे जाणे टाळत होते, पण असे वाटले शेवटी तोच पर्याय उरला आहे. मात्र सर्व साक्षीदार उलटतात व पैकरचा गझनी होतो. नाकबूल करतो. तक्रारी नको, मी खूप दिवस स्वतःला थांबवले; वाटले होते की कुठे तरी कधीतरी न्याय मिळेल. वाईट गोष्टी सांगू नये म्हणून गप्प बसले पण हे सर्व वाईट मी सहन केले ते मी किती काळ मनात ठेऊ? कुणाच्या विरोधात नको म्हणून थांबले पण माझ्या विरोधात मात्र बरेच होते. कारण रिकामपणात बसणे हे त्यांचे कॉमन ध्येय होते.

गांधीजींची तीन माकडे आठवली.

बालपणापासून घरातील त्या तीन माकडांच्या मुर्तीला आई व आजी गांधीजींची तीन माकडे म्हणत असायच्या. त्या माकडांची तेव्हा चलती होती.

बूरा मत सुनो

बुरा मत कहो

बूरा मत देखो

बूरी है बुराई मेरे दोस्तों!

हे गाणेसुद्धा त्यावेळी खुप लोकप्रिय होते. गांधीजींच्या या तीन माकडांच्या मूर्तीतील एक माकड वाईट बोलू नये म्हणून तोंड झाकून घेते, दूसरे माकड वाईट ऐकू नये म्हणून कान बंद करते व तिसरे माकड वाईट बघू नये म्हणून डोळे झाकून घेते. माकडांना सुद्धा इतकी अक्कल असते, ती सुद्धा काही माणसांना नसावी याचे नवल वाटते. इतका महत्त्वाचा संदेश ती तीन माकडांची मूर्ती देते. तो समजण्यास त्याच माकडांचा विकसित वारसदार मेंदू विकसित होवूनही अयशस्वी ठरावा? का? माकड नासधूस करतातच.एखाद्या सुंदर बागेत एखादा ''आधीच मर्कट त्यात मद्य प्याला म्हणावे' अशी वेळ येते! मध्यंतरी असेच एक अधिकारी आमच्या संस्थेत येवून गेले. जे बोलू नये ते बोलावे अगदी असंबंध म्हणजे Without regarding and reference ! वाईट ऐकावे तेही कान भरवणाऱ्या मंथरा व अकृष्ण शिष्टाईवाल्यांचे! वाईट बघा ते चांगले काम करणाऱ्या निष्कलंक लोकांच्या अहीताचेच! त्याने या संस्थेच खूपच पडझड केली. धुमाकुळ घातला.

चौदा वर्षे रामाने वनवास सोसला, तसा १४ महीने आम्हाला वैताग आला. या व्यक्तिला चौदावे रत्न दाखवावे की काय इतके हीनकस व रुचीहीन विचित्र बोलत असे. गेला!

बदली होवून गेला पण झालेली पडझड नवीन व्यक्तीने सुधारायला हवी. शिवाय त्याच्या नवीन बदलीच्या ठिकाणी अशी पडझड होवू नये अशी काळजी घ्यायला हवी. एखाद्या दुष्ट अशा शक्तीचा विजय अनेक सज्जनांचे खच्चीकरण करतो. बदलीच्या जागी सुद्धा कॉर्पोरेट, पेज थ्री अशा चित्रपटांसारखे खलनायक कुठल्याही संस्थेत कधीही येऊ नयेत. जर आले तर संघटीतपणे कामगार संघटनांनी त्यांचा विरोध करावा, निषेध करावा. त्यावेळी साहेबांविरुद्ध वाईट बोलू नये, साहेबाचे वाईट गुण बघू नयेत, साहेब वाईट बोलला हे ऐकूनही न ऐकल्यासारखे करावे, नाकबूल व्हावे असे करू नये. बुरी है बुराई मेरे दोस्तों!

बोबड्या बोलणाऱ्या पैकरचे मात्र उलटे होते. बघू नये तिथेच बघायचा. बोलू नये ते बोलायचा व ऐकू नये ते शब्द ऐकायचा. त्याला गर्व झाला होता.

पैकर वाटेल ते बोलत असे. फोनवर असंबंद्ध बोलून खोटे आरोप करी.

''साहेब! पक्षी, झाडे, निसर्ग यांत रमणारी बाई आहे मी.'' – मी

''हो तुमचे आता म्हातारपणामुळे तेच दिवस आहेत.''– पैकर

''वय तर तुमचेही झाले आहे. मात्र तुम्ही दलदलीतच रुतून बसला आहात.''

''मी सांगतोय ना, नीनासाठी बाहेर पडा.'' पैकरला ही शाखासुद्धा मी सोडावी असे वाटत होते. मी बाहेर पडले. रस्त्यावर गुलाबी तामण महाराष्ट्राचा राज्यवृक्ष बहरला होता व हनीबर्ड त्यातील फुलांमध्ये उडत बागडत होता. रस्त्यावर गर्दी होती. चणे-दाणे विकणारा, गजरेवाला, भेळवाला, खोटे दागिने विकणारी फेरीवाली, सर्वजण आपापल्या कामात मग्न होते. त्यांच्या त्यांच्या

कामात खूष होते. माझे मात्र पोट मारले जाण्याची शक्यता होती. बेकार, वेळकाढू वृद्ध देवळे पोथ्यांत रमतात, तरुण मंडळी दुसरी नोकरी शोधतात. मी कुठेही बसत नव्हते ? अपयश का येते ? अस्तित्वाच्या लढाईत मी का हरते ?

शहरीकरणाने जसा पक्ष्याचा शहरी जीवनातला रस संपला तसा माझाही त्या संस्थेतील रस संपू लागला. शब्दांच्या नाण्यांचा खजिना ओठावर येत होता, पण लिहायला हातच चालत नव्हते. खिडकीशी उभी राहून पक्षी बघत बसले. पक्ष्यांची घरे पण दूरवर असावीत. सेंट्रल-वेस्टर्न हार्बरवरच्या त्या घराच्या दिशेने पक्षी पळत होते. झाडांच्या ढोलीत, मातीच्या भिंतीमध्ये, झाडांवर, पानांवर वेगवेगळी घरटी टांगली होती. महाराष्ट्राचा राज्यपक्षी, पिवळ्या पायाचा, हिरवा कबूतर व टुईयां झाडांवर बसले होते. संध्याकाळ झाली. सोनपक्षी,

सूर्यपक्षी मकाऊ घराकडे परतु लागले.

हिरवे पिवळे लाल पक्षी

आहे मजा लिहिण्यात या

समुद्रपक्षी गगनलक्षी

सागरी लाटा निळ्या

सांज किरणे सोनियाची

जुळून तुटती साखळ्या

उंच माड पाठीशी उभा

संथ झुलवे झावळे

संगतीला माझ्या सखी तू

सुंदर मंद सावळे

(संग्रहीत)

मी राजीनामा लिहून दिला याचा सर्व साखळीत त्यांना आनंदच झाला. पैकर फोनवर म्हणाला ''पगार मिळतोय ना एक तारखेला, म्हणून हे भीकेचे डोहाळे लागते. लिखाण्याच्या पैशासाठी चार वेळा खेटा घालशील. ''शब्दांच्या प्रेमात पडून भीकेलाच लागशील'' टीव्हीमुळे लोक वाचतच नाहीत. अडाणी झाले आहेत.'' तूच लोकांना दुखावलेस. स्वतःचे नुकसान केलेस, मी तर मजेतच आहे व कांडे तर उत्तम आहे. तुलाच फाके पडतील आता! पळपुटी!'' – मी फोन बंद केला.

निरंजनातील सांजवातीत

ज्योतिचीच मोगरी कळ्यात

गूढ अनामिक ओढ असते

शब्दांहून भावना जड असते।। – मी

हो मी ही कामावर जाणे बंद केले. मला त्यातील पैसे तो लाभ ती हानी काहीही नको आहे. मी सपशेल हरले आहे. मी केशरी दुधाने भरलेले पातेले टाकून दिले. कारण त्यात विष पसरले होते. फक्त कस्तुरी पक्षी शोधण्यासाठी थोडे दिवस तिथे राहणार होते. फक्त ७ दिवस! ही प्रेमकथा नाही, पण शोधाची कहाणी होती.

सर्वच रामायणात राम नसतात. काही कथा रावणकथा असतात.

फक्त नोकरी करणे म्हणजे आयुष्य नव्हते, पण फसवणूक करून मला बळीचा बकरा केला व माझे पोट मारले याची व्यथा आहे. मी स्त्री आहे म्हणून हरले? ते पुरुष म्हणून जिंकले? का? प्रश्नांना भिडायला हिम्मत लागते. प्रश्न दडवण्याकडेच कल असतो. सत्यमेव जयतेमध्ये वेगवेगळ्या विषयांना हात घालणे. अमीर खानलाच शक्यच होते. कारण तो सेलीब्रिटी होता. बाकी प्रश्नांबद्दल बोलणाऱ्याचा आवाज बंद करणे हा समाज स्वीकारतो.

पर्याय

‘‘कौन बनेगा करोड़पती’’ला अगदी वरच्या पडावाला पोहोचल्यावर खुषीत एखादा पर्याय चूकीचा निवडला की माणूस धडाधड खाली कोसळते; त्यावेळी त्याला वाईट वाटते त्याला दोष दिला जातो, मात्र ते त्याचे नशीब असते. आपल्याला सुद्धा कधी वाटते आपण वेगळा पर्याय, वेगळी वाट निवडायला हवी होती. टर्निंग पॉईंट पाशी निर्णय चुकतो की हा निर्णय विधिलिखित असतो? जे मिळते त्याला पर्याय नसतो. सत्याचा स्वीकार करूनच घ्यावा लागतो. ते irreversible असते.आयुष्याच्या उतरणीच्या वेळी जर-तरचे विचार छळू लागतात. पण जीवन

रिवाईंड होत नाही. ''जीवनाच्या संध्याकाळी मी तृप्त आहे, मला कशाचाच पश्चाताप नाही. मी खुष आहे.'' ही वाक्ये निवृत्तीच्या निरोप समारंभाला छान शोभतात. आयुष्य कसेतरी वेगळे घडायला हवे होते असे नेहमी वाटते.

तुम मिल जाते, तो हो जाती,

पूरी अपनी रामकहानी

हर घर ताजमहल बन जाता

गंगाजल आँखों का पानी।।

पण असे होत नसते म्हणून ताजमहाल एकच आहे व गंगाजलही दूषित आहे.

तू नहीं तेरा गम तेरी जुस्तजू भी नहीं

गुजर रही है कुछ जिंदगी ऐसे

जैसे इसे किसी सहारे की आरजू ही नहीं

सखीचा फोन आला.

''विनातक्रार, मनातून चडफडत दुसऱ्याचा हेवा करत जगणे मानवी स्वभाव आहे. करियर चांगले नसणे, जीवनसाथ्याची निवड चुकणे, मित्राची निवड चुकणे, आपल्याला सर्व सेकंड

बेस्ट, सेकंड्स मिळणे अशा प्रकारची जखम मनात राहते. ज्यांना स्वप्नेच नसतात, ज्यांच्यात काही खास गुण नसतात त्यांच्या मनात, जर असे झाले असते तर? हा सल नसतो.'' –मी

''बाकी ही खंत बऱ्याच जणांच्या मनात असते. नाईलाजाने का होईना जीवनात आलेल्या व्यक्तींना स्वीकारले. स्वतःच्या जीवनातील सर्व निर्णयांना व सुखदुःखाला आपण स्वतःच जबाबदार असतो. इतर कुणीही नसते आणि'' – सखी

चॅटरींग ग्लोरी, कस्तुरी पक्ष्यासारखे मातीत चोच खुपसून विषण्ण बसणे नशीबी येते, एकाकी समूहापासून दूर!'' – मी

''इतरांना दोष देवूनही काही फरक पडत नाही. नूरजहान राणी, अकबराबरोबर नाईलाजानेच आली पण तिने हे स्वीकारले. प्रसिद्ध चित्रकार, शल्य विशारद, कलाकार सुद्धा जी करियर मिळते ती करतात. स्वीकाराची भावना ठेवली की ''ऑल इज वेल'' होते. जे बदलू शकत नाही, त्याबाबत दुःख करून काय उपयोग. पर्याय आहेच कुठे? – सखी

''नो 'करी' नो 'वरी' नोकरी सोडली की अर्धपोटी रहायचे पण चिंतामुक्त राहाता येते. कस्तुरी राजा काही वर्षांनंतर इतर वस्तीपासून दूर जातो. गावाबाहेर इतर पक्ष्यांपासून दूर घरटे बांधले की तिला (राणीला) शांत वाटते.'' – मी

शाखा बदलून काय उपयोग? समजा एका फुटक्या खराब टाकीचा गळता नळ बदलला, थोडी गळती कमी होईल पण टाकी गळायची थांबणार आहे का? – सखी

एके दिवशी पैकरवर आरोप आला. पैकरची गाडी काढून घेण्यात आली. पैकरची सत्ता गेली. मात्र एका दुसऱ्या मैत्रिणीच्या मित्राचा तिसऱ्या बायकोच्या गाडीतून तो येत होता व ती गोष्ट त्याने मिटवली, दाबली. शेवटपर्यंत त्याने नोकरी केली ती सेवा नव्हती पण ती नोकरी त्याला पैसे, स्थिर उत्पन्न देत राहिली. TRO चे Troden लोक मजेत होते, नवा गडी नवे राज्य सुरू झाले होते. शहरी लोकांचे बरे असते. झकपक राहून छाप पाडतात. मी तशी खेड्यापाड्यातच राहीले. साधीच राहिले. घरची गावची, माहेरची खेडी आठवण येणारी कोवळ्या मनाची मी त्या संस्थेत करपत होते, भाजली जात होते. फेरीवाले वस्तू विकतात, तशी मी संस्थेच्या योजना विकत होते. दोन्हीत फरक नाही का ? दोघेही असुरक्षित ? मग मॅनेजरपणाचा काय उपयोग ?

माझ्या आधीच्या मॅनेजरवर काहीच जबाबदारी नव्हती आणि नंतर आलेल्यांनाही नव्हती मग माझ्याच खांद्यावर हे बलुतं, बुढीचे खटले का बरे लादले ? मी स्त्री आहे म्हणून ?

कोवळी पाने गळाली

फुलपाखरांचे पर्वत राशी

चित्रामध्येच उरली

निळीकोट घातलेला ससुली

ॲलीसला बघून रुसली

चांदण्याची टिकली

आणि चंद्राची ती बिनली

चंदेरी रंगातून फक्त

कला मनातच रुतली

मी स्वरुपानंदांच्या आश्रमात पोहोचले. समोर भजन चालू होते, शब्द कानावर पडत होते, पण अर्थ कळेना.

विठ्ठला ने मज वैकुंठा

गगन भरुन तुका उरला भरली सुखगाथा

एक आस ही उरली आता ने मज वैकुंठा

तुझ्या कृपेचे हे संजीवन कृतार्थ माझे अवघे जीवन

विसरुन गेलो माझे मी पण अंतरी तुझीच ती मूर्तता।।

कृतज्ञतेने देवा वंदन, नामदेवा स्वप्नी चिंतन

दीप चिरंतन, येऊ दे मन मागुता।

खेड्यातल्या माहेरची आठवण आली. क्षुद्र फायद्यासाठी दुसऱ्याचा बळी घेणारे सराईत मी या संस्थेतच बघितले की बदलत्या काळाबरोबर गाव पण बदलले असेल? माझे माहेर पण आता तसे असेल का?

घाल-घाल पिंगा वाऱ्या माझ्या परसात

माहेरी जा सुवासाची कर बरसात

सुखी आहे पोर सांग आईच्या कानात

आई भाऊसाठी परी मन खंतावत

विसरली का ग भादव्यात वर्ष झाले

माहेरीच्या सुखाला ग मन आसवले

फिरुन-फिरुन सय येई

जीव वेडावतो

चंद्र कळेचा गं शेव ओला चिंब होतो

काळ्या कपिलेची नंदा खोडकर फार

हुंगहुंगुनीया करी कशी गं बेजार

परसात पारिजातकाचा सडा पडे

कधी फुल वेचायला नेशील तू गडे

कपिलेच्या दूधावर मऊदार साय

माया माझ्यावर दाट, जशी तुझी माय

आले भरून डोळे पुन्हा गळाही दाटला

माऊलीच्या भेटीसाठी जीव व्याकुळला

आता गायी नाहीत, झाडाला बांधलेले झोके नाहीत, गाईचे ते लुचणारे, हुंदडणारे वासरु, शेतातली मोट हल्ली दिसते का? देवळांमध्ये फिरणे, अंगण रांगोळी, डब्बा पार्टी, सर्वच माहेरच्या गोष्टी मागे पडल्या. आंब्याचा पार, गावाचे रस्ते, नागाची वारुळे मंद रातराणीचा सुगंध संपला. मुंबईच्या शहरात दंश बाकी उरला. मधुर दंश-सिमेंटची रंगहीन जंगले, हसायला जीवावर येतील अशी माणसे कागदी फुले व कृत्रिम उत्तरे! मनात माया नसलेले वरवरचे कौतुक, एश्ए! सर्वच नूर्ल्ल खोडे बेगडी! वर्ख लावुन बाहुल्या शिमग्याच्या सोंगासारख्या नाचतात आणि खऱ्या सौंदर्यवती कुठेतरी दुखऱ्या कोपऱ्यात फेकल्या जातात, शहीद होतात. पक्ष्यांचे आवाज रिंगटोन म्हणून मोबाईलवर लावतात आणि खऱ्या पक्ष्यांची शिकार करतात.

एवढासा तो जीव, ते पक्षी त्यांना मारण्यात कोणता पुरुषार्थ की शौर्य असते? वातावरणाशी एकजीव होऊन पानाआड, झाडांच्या ढोलीत राहणारे पक्षी कुणाचे काय बिघडवतात? पण त्यांना मारले जाते?

मी आयुष्यभर पळतच राहीले, गावीही, मुंबईलाही.

गड्या आपुला गाव बरा?

की सुखी मुंबईकर ?

ह्युमन डेव्हलपमेंट रिपोर्ट, मुंबई यांच्या पाहणीनुसार मुंबईकर हे अन्य महानगरांतील व्यक्तिंपेक्षा अधिक सुखी आहेत असे मुंबई महानगरपालिकेने जाहीर केलेल्या रिपोर्ट नुसार प्रसिद्ध झाले आहे. (Asian Age ३१.१०.२००९). चेन्नई, बेंगलोर, पणजी, पुणे, दिल्ली, हैदराबाद, कलकत्ता, चंदीगड व अहमदाबाद यांना मुंबईकरांनी मागे टाकले आहे.

घरगुती वापराच्या वस्तूंच्या विक्रीवरून सुख ठरवणे योग्य नाही तर आरोग्य, शिक्षण, स्त्री-पुरुष समानता ही तत्त्वे ही या पाहणीत १९९० पासून सुखाचे मापदंड म्हणून मोजण्यात आली आहेत.

मुंबईची झोपडपट्टी हा मुंबईचा अविभाज्य भाग आहे. या झोपडपट्टीत ७७५२६ शौचालये आहेत. मात्र आवश्यक आकडा १२५०५५ आहे. एका हॉस्पिटल बेड वर १३०९ नागरिक असा आकडा आहे. जेव्हा इतर ठिकाणी तो ४८७ आहे.

मराठी माणसांच्या मुंबईत एक मराठी शिक्षक २४७१ विद्यार्थ्यांना शिकवतो मात्र एक इंग्रजी शिक्षक ८३५४ विद्यार्थ्यांना शिकवतो. (इंग्रजीची मागणी जवळजवळ ४.५ पट आहे) मुंबईत २४.९८ परप्रांतीय उत्तर प्रदेशातून आले आहेत तर सी वॉर्डात ८९२ स्त्रिया १००० पुरुषांशी प्रमाणात लोकसंख्येत आहेत तर डी वॉर्डात १००० पुरुषांमागे फक्त ५८७ स्त्रिया आढळतात. वाढते ध्वनिप्रदूषण, प्रदुषित हवा, बोजा सहन न होणारे इन्फ्रास्ट्रक्चर, कामकाजासाठी आवश्यक दूरचे

प्रवास असुरक्षित दिनचर्या या व्यतिरिक्तही मुंबईकर हा सर्वात जास्त सुखी ठरला आहे. तरीही म्हणे मुंबईकर साठ वर्षांहूनही कमी जगतो.

मुंबई स्पिरिट यालाच म्हणतात, छोटे आयुष्य सुखी आयुष्य .

जय मुंबईकर? तडजोड की नाईलाज? कधी वाटते, 'गड्या आपुला गाव बरा.' 'कधी वाटते मुंबई आमची मुंबई.'

फिलगुड ही एक वृत्ती असते. मला सकाळपासूनच असे दु:खी विचार केले की ''विश्वाचे आर्त माझे मनी प्रकाशले'' असे वाटत असे. वर्तमानपत्र सकाळी वाचली की तर त्या बातम्या फेर घालून घाबरवतात. राहू दे तो पक्षी, ती नोकरी नको. सुरक्षित, घरी, नवऱ्याजवळ रहायला जावेसे वाटे. पण दिवसांचे रकाने भरत राहीले का?

प्रत्येक तारखेला कॅलेंडरमध्ये एक रकाना, रिकामी जागी असते. जरी काही दिवस संपता संपत नाही, म्हणून, नाईलाजानेच ते दिवस काढावे लागतात. ते ही दिवस तसे सणाचे दिवाळीचेच होते. हवेत थोडासा गारवा होता पण त्या विभागात रखरखाट जाणवत होता. माझे बहीरीमाता देवीजवळच्या खडकावर बसून मावळतीचा सूर्य निरखणे चालू होते. तेवढ्यात एक ट्रकजवळ येवून थांबला. ट्रकच्या ड्रायव्हरने मागची फळी उघडली त्यातून एक स्टूल काढला. त्या स्टूलवरून ४/५ महिला, २/३ मुले उतरली. नंतर वृद्ध आई- बाबा उतरले. सर्वजण दर्शन घेवून आले. खाली सतरंजी टाकली स्टो काढला. त्यांच्या सोबत एक कढई व तवा होता. कढईत पिठले केले, तव्यावर भाकरी केल्या. वर्तमानपत्राच्या कागदावर जेवणे केली व कारवा पुन्हा पुढे निघाला. अगदी अतिसामान्य घरातील कुटुंब होते. पण त्यांना जणू आनंदाची पेटिका सापडली होती.

अंबादेवीजवळ तेच! मी आपली सारस पक्षी, घुबड, शिकऱ्या, कोतवाल, खंड्या, मलबार 'हॉर्न'बील बघत होते. मलबार हॉर्नबिल हसल्यासारखी शीळ वाजवतो. परत जाताना स्टूलवरून पुन्हा कुटुंब वर चढले. तेव्हा त्यांच्यातील एकजण म्हणाला, बेसन संपले आहे ते घ्या. आजी म्हणाली मी राखण राहते तुम्ही फिरुन या. एका बीन पोल प्रमाणे फक्त वेल उभी रहावी म्हणून अंधाराला लावलेल्या काठीप्रमाणे ती व्यक्ति नुसती असते, पण निरुपयोगी नसते. अन्यथा फक्त दूरदर्शनवरच्या मालिका बघून वेळ काढणाऱ्या महिला काहीच साध्य करीत नाहीत. काही घरी तर पुरुषसुद्धा अशा मालिकांच्या व्यसनात गुंतू लागले असताना तिथे ती आजी ते सर्व राखत बसली. तिने कांदे कापले, दूध विकत घेतले, चटईवर आडवी पसरली. आजींना मी बोलते केले तेव्हा म्हणाला, ''महागड्या भाज्या व पसारा परवडणार नाही. सत्तावीस जण, हा ट्रक, कांदे बेसन, भाकरीचे पीठ व सतरंजी यावर आमची ही सहल आहे. खर्चायला पैसा नाही, मात्र दिवाळीची मजा, जमलेल्या मुलांना सहलीची गंमत आणि आम्हाला दूरदर्शनच्या त्रासातून सुटका आणि देवदर्शनाचे पुण्य मिळते. अगदी एखाद्या दिवशी खिचडी करतो. चहा रोज करतो. खर्च कमी ठेवतो. वर्षभर आम्ही ह्या सहलीची चर्चा करतो. दिवाळीत घर लहान पडत असतेच. त्यामुळे एकत्र जमता येत नाही. गृहीणी घरकाम करत राहते. त्यापेक्षा अशा सहलींना मजा येते. एखाद्या देवळात औक्षण करून घेतो. फराळाचे महागडे पदार्थ करण्याऐवजी लाडू चिवडा सोबत घेतो. एखाद्या देवळासमोर या पोरी रांगोळी काढतात. चार भिंतीनीच घर बनते काय? जिथे सोबत आपली माणसे आहेत तिथे आनंदाने दिवाळी साजरी करायची. मी दिवसांचे रकाने भरताना कधी कधी त्या आजींची आठवण काढते. आला दिवस साजरा करायचा म्हणजे रकाने भरायचे. घरट्यात पक्षी जोडीजोडीने परतत होते. मी मात्र एकटीच होते. मात्र त्या एकटेपणाचे आठच दिवस होते. कृत्रिम प्रकाश, प्रदूषण, आवाज,

वाहनांची ये-जा याच्या त्रासाने कस्तुरी पक्षी गाणे बंद करतो. त्याच्या त्या शीळेसाठी शिट्टीसाठी त्याला अधिकाधिक त्रास दिला जातो. कस्तुरीपक्षी मरून पडतो पण इतरांना हवे म्हणून गात नाही. खेदाने, स्वतःच्या मर्जीने जगता न आल्याने काहीच उरले नव्हते.

## तिरपी उन्हे

आयुष्याची तिन्ही सांज झाली की, जीवनाचे ऊन्ह कळू लागते. झाडांच्या शेंड्यावरून सूर्यनारायण चोरपावलाने निरोप घेत आहेत. मी जडमनाने व दुखऱ्या पायांनी बघते आहे. झाडे किती सोशिक असतात, मोसम पाहून रंग बदलतात. पाने गळली तरीही गप्प बसतात, एकत्र राहतात पण एकेकटी जगतात. एका वर कुऱ्हाडीचा हल्ला झाला तरीही गप्प का बसतात? पर्याय नसल्याने एका जागी स्थिर राहतात. माणसांना चालावेच लागते. खरेतर, माणसांचे तरी वेगळे काय असते? स्थिर रहावे लागते मजबूरीने!

'यूं सारी जिंदगी मर मर के जी लिये' हे गाणे फेमस झाले. कारण ते सत्य आहे. गोष्टी मागची गोष्ट हीच असते की तडजोड करत, मरत मरत जगावे लागते. एखाद्या गावातील चिंचोळ्या गल्लीतून बाहेर पडावे लागते व खंतही व्यक्त करता येत नाही. भारद्वाज पक्षी ताठ्यात वावरतो. पण तोही माणसाची चाहूल लागताच उडून जातो तसे स्वाभिमानाचे नाटक केले तरीही, यूं सारी जिंदगी मर मर के जी लिये हे सत्यच ठरते, उरते, उन्हे मध्यान्हीची असोत. पण त्यांना तिरपी उन्हे व्हावेच लागते, वयोमानाने. स्वातंत्र्य देशाला मिळाले, मनांना नाही. उतरणीला बदलीची आशा स्वातंत्र्याची ओढ आता मनांना नाही. दारुडे ज्याप्रमाणे दुःख विसरायला नशा करतात तसेच

वेगळ्या ग्लानीत व नशेत मध्यमवर्गीय अलिप्त राहून वावरत आहेत. अपघाताचे फोटो काढणारे त्या अपघात ग्रस्तांना मदत करतात का? की फक्त चर्चाच करतात? एखादी चांगली व्यक्ति हरते ती हार वैयक्तिक नसते संपूर्ण समाजाच्या नितीमत्तेची असते. वाईट माणसे असतातच पण दुर्दैव हे की चांगली माणसे त्यांचे कर्तव्य टाळतात, अलिप्त राहतात. उन्हे कलली आहेत व स्त्री म्हणून असलेली सहनशीलता आता संपत आली आहे. उरली आहे एक अनामिक भिती! चिंध्या झालेली अस्मिता, अपमानाची सल घेवून थकलेल्या गात्रांनी निरोप घ्यावा लागतो आहे. समाज मात्र प्रश्न टाळून फीलगुडवर खूष राहतो आहे. करमणूकीचा अतिरेक झाला आहे. आज माझ्या कस्तुरीशोधाचा शेवटचाच दिवस होता. पक्ष्यांचे स्थलांतर ह्या उपविषयाचे लिखाण चालू होते. कस्तुरीपक्षी इतर पक्ष्यांप्रमाणे केमोफ्लेज करून पानांमध्ये दडू शकत नाही. त्यामुळे भक्ष्य ठरतो. त्याच्या शिट्टीवरून त्याची जागा कळते, घरटे कळते. त्यामुळे त्याला पकडले जाते व तो नष्ट होतो.

गगन ठेंगणे व्हावे एका हर्षाने

लेक माझी म्हणताना माझी म्हणून ओळखावी

समाजात डौलाने हिऱ्या प्रमाणे चमकावी

असे म्हणणारे आई-वडिल काळाच्या पडद्याआड गेले आहेत व चमकू न शकलेली मी अंधाराच्या पडद्याआड चालली आहे. हो मी हरले आहे. उन्हे कलली आहेत, आणि छोड़ आए हम वो गलियां; हे सत्य आहे!

दुःखातच मी डोंगरावर गेले. मला ती एकाकी कस्तुरी पक्षीण दिसली. ती दुःखी नव्हती. तिचा सहचर तिच्या मनात होता. ती अजूनतरी मातीत चोच खुपसून निपचित पडली नव्हती. तिची जीवन लढाई ती लढत होती. एवढेसे पंख तिचे, पण ती अज्ञात आकाशात मैलोन्‌मैल प्रवास करून जाई. जुन्या ठिकाणी इतर पक्ष्यांनी वाळीत टाकले की ती नवीन जागी जाऊन घरटे बांधी. ती हरली नव्हती. पक्षी मित्र संघटनेच्या संस्थेला मी त्या पक्षीणीचे फोटो, माहिती, मेल पाठवले. तिची अंडी शोधण्याच्या मोहीमेसाठी एक टीम बनवावी व पाठवावी असा संदेश मेल केला. मधचोख्या, हमींगबर्ड, सूर्यपक्ष्याचे फोटो पाठवले. ''प्रदूषणाने पक्षी जीवनावर होणारा परिणाम.'' मी माझ्या संशोधनाचा शेवटचा टप्पा पूर्ण केला व संगणकावर माझा थिसीस (प्रबंध) पाठवला. सेंड करून ती माहिती पोहोचली. उद्या माझ्या त्या संस्थेतील निरोप समारंभ होता.

पिशवीत सामान, लॅपटॉप, नोटबुक भरून खाली उतरले. सूर्य मावळला होता. नवगावची ही शेवटचीच संध्याकाळ होती.

## पाऊल थकले

आज मी त्याच वळणावरच्या भैरोबाच्या देवळापाशी उभे आहे. ३१ वर्षांपूर्वी मी इथूनच माझ्या या संस्थेत पाऊल ठेवले. आज, नोकरी सोडल्याचे पत्र घेवून तिथे आले. ३१ वर्षे मी नोकरी करीत होते. सोडताना मला पगारसुद्धा नको आणि तो छळसुद्धा नको असे ठरवून मी ती नोकरी सोडली. माझा तो निर्णय पक्का होता.

पण शेवटचा दिवस जवळ आला आणि वाटू लागले. मी लढू शकले नाही, हरले.

''मला हा त्रास नको'' म्हणून मीच जाणे हा पळपुटेपणा नाही का ? हा माझा अंहकार आहे का ? ३५००० लोक ह्याच परिस्थितीत दिवस काढून वेळ मारून नेतात. मलाच हे नकोसे का वाटावे ?

मागच्या महिन्यात एक दिवस रॉय साहेबांनी बोलावले व त्या लोकांनी नोकरी सोडू नकोस, आम्हालाचांगल्या कर्मचाऱ्यांची गरज आहे म्हटल्यावर, अहंकार सुखावला होता. पण पुन्हा असुरक्षितता फणा काढून उभी राहीली. अपमृत्यु, बलात्काराची भिती घेऊन मी या संस्थेत अधिक काळ काढू शकणार नव्हते. वयोमानाने प्रश्नांपासून पळायला पाऊल थकले आहे. या जगात ''फक्त पैशांसाठी'' वाटेल त्या थरावर लोक जावू शकतात. ''लढ झगड़ आगे बढ़'' म्हणून पुढे जावे हे सांगणे ठीक असते पण संघर्ष सोप्पा नसतो. युद्धभूमीत अर्जुनाला जसे आपलेच प्रियजन समोर बघून युद्ध करावेसे वाटेना, तसे मला त्या झुंडीशी लढायला शक्तीच मिळेना! शेवटच्या दिवसापर्यंत अनाम भिती वाटत होती. काहीतरी संकट तर येणार नाही ना!'' शेवटचा दिवस गोड व्हावा, आपल्यातल्या काहींनाच माझ्याबद्दल अंति परिचयात अवज्ञा झाली होती किंवा मी त्यांच्यात ऑड मॅन आऊट होते.

तुकाराम महाराजांना जसे देवाने सोन्याचे विमान पाठवून त्या स्वर्गलोकी बोलावले तसे कोणीतरी 'व्ही आय पी' येईल, माझ्या हातात. माझ्या निवृत्ती निधीचा चेक ठेवेल असे वाटत होते. मात्र कुणीच आले नाही. माझ्याच ऑफिस मधल्या लोकांनी तो समारंभ गोड केला, जे लोक माझे वाटत होते, त्यांच्यातील तो आनंद होता, मात्र वरिष्ठांनी माझी किंमत न केल्याची खंतसुद्धा

जाणवत होती. प्रत्येकच नाण्याला दोन बाजू व एक परीघसुद्धा असतो. कस्तुरब्याला ग्राहकांकडून धमक्या आल्या. ती स्वेच्छानिवृत्ती वरिष्ठांनीच पुरेसे संरक्षण न देवून माझ्यावर लादली होती. ह्या नवागावच्या ऑफिसात मला दहा महीने झाले. मी ते दहा महीने कसे तरी काढले म्हणू शकत नाही. कारण मला इथे खूप आनंद मिळाला. नोकरीत कुतर ओढ होती पण ओढ होतीच. नवागावची माणसे देव माणसे होती.

'सेवानिवृत्तीच्या पैशांसाठी तिला जोड झिजवायला लावू' अशी धमकी पैकरने व एकाने दिलीच होती.

निवृत्तीनंतर हक्काच्या कष्टाच्या पैशांसाठी संधीसाठी जास्ती उतावळे होऊन चालणार नाही, कुठे तरी कुणी तरी माझी वाट बघत असेलच! चांगल्या नोकरांची पण गरज असतेच!

मी त्या नोकरीतून निवृत्ती झाले. रोम नावाचे शहर होते. एका रात्रीत रोम बनले नाही पण उध्वस्त मात्र झाले. एक रिकामे पण भरुन राहीले. नक्की काय करावे ते कळेच ना! रोज कुणाकडे जायचे व फोनवर किती बोलायचे. नवीन मैत्रिणी कुठे शोधायच्या? आरोग्य महत्त्वाचे होते. शारीरिक हेळसांड होत होती. पण आता मानसिक हेळसांड तर होणार नाही ना! मनाचे दुःख शरीरावर पसरून उपयोग नाही.

१३/४/२०१२ मुलगा स्काईपवर म्हणला, What appear to be bitter trials are blessings in disguise, तू कस्तुरीपक्षी हे संशोधन चालूच ठेव. मी 'हो' म्हणाले.

# भाग - ३

आज वाटते काल-परवाच आपण निवृत्त झालो आणि आज कंटाळा आला. कारण हेळसांड करायची व 'न' जगण्याची सवय झाली आहे ना! आता सर्वच जण आपापल्या व्यापात असतात किंवा व्यापलेले असतात.

मला मात्र व्यापक विश्वाची सवय झाली आहे ना! अडनीड वयात आपण उगीच का निवृत्ती घेतली? अजून थोडी उमेद बाकी आहे. पण शरीर साथ देत चालत नाही. जुन्या मैत्रिणी दूर गेल्या आहेत व नवीन बनू शकत नाहीत. पूर्वी एका वेळी ४ नंबर घेवून वेगवेगळे फोन करीत असे, काय बोलावे न कळून मी पेन्शनचे कितपत आले विचारायला ऑफिसमध्ये फोन केला. पेन्शनचे कसले तरी कागद बाकी होते, ती साहेबांची सही झाली. सोमवारी बांद्रा शाखेला भेटा सांगितले. त्यावेळी मी खूष झाले. निदान माझे कष्टाचे पैसे ही संस्था बुडवणार नाही. मी कायमच प्रतिकूल परिस्थितीत सुद्धा धडाधड, धाडधाड काम करीत होते. कामचोरी कधी जमलीच नाही, त्यामुळे आता कसेसेच होते. उत्कृष्ट चित्रकार होते मी पण आता मी काही करू शकेन का? संशयच वाटतो. त्यात एप्रिल, मे मधील छंदवर्गांची गर्दी फुल आहे. सध्या तरी काही करावेसेच वाटत नाही.

५५ वर्षे वयापर्यंत त्या संस्थेने रक्त पिऊन घेतले आता त्यांना तरुण रक्त हवे म्हणे? पूर्वी किती बेत होते. पण ते सर्व १५-२० मिनिटात पूर्ण होतात. उदा. फोन करणे, व्यायाम करणे, कुणाकुणाला भेटणे, घरकाम करणे, खरेदी, आवरा-आवर, FDR लिहीणे. पुस्तकांचे ISBN, Editing, सह्या घेणे, घर शोधणे. मैत्रिणीला फोन केला ती सिनेमाला चालली होती, ती कायम हाऊस वाईफच आहे. ''अगं काहीतरी वेगळे करायचे म्हणून मी नोकरी सोडली आणि काहीच 'न' करता बसून राहायचे? ४ वर्षे महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाच्या पुस्तकाच्या मागे धावत होते. आता कशामागे धावायला काही उरले नाही.''

तिला त्यातले काही कळले नाही. ''पूर्वी मी बोलवायचे तर तुला वेळ नव्हता.'' ती म्हणाली. कुणा Flashback मधल्यांना भेटावे तर माझ्याकडे फोन नंबर सुद्धा नाही. एवढा रिकामा वेळ आयुष्यात कधीही मिळाला नव्हता. करमणूक व आनंदाची व्याख्या करायला, विचार करायला कधी वेळच मिळाला नाही. दोन प्रेमिकांना राजपुत्र व राजकन्यांना जेव्हा एकत्र बांधतात तेव्हा त्या अतिरेकी सहवासाने विटून ते ती बंधने तोडून दूरदूर जातात, तेव्हा एकमेकांकडे बघत सुद्धा नाहीत. एका ठराविक अंतरावरुनच सर्व काही ठीक दिसते, (Distance of Districe Vision म्हणतात त्याला) दूरवरचे अंतरामुळे परके, तर जवळचे डोळ्यातच शिरतात बाणाप्रमाणे! पण ती व्यथा, ती वंचना, ते ब्रेकअपचे दुःख ते कुठे सोडून येऊ? बाजारात गेले, एक मैत्रिण भेटली. झिम्मड पावसाची सुरू झाली. आडोशाला उभे राहिलो.

पुनरावलोकन करूनही आयुष्याचा सारांश कसा लिहावा ते कळेना झाले. ''प्रश्न तेच – पैसे किती मिळाले?'' काय करणार. Fishpond मधल्या माशांना त्या बाहेरच्या जगातील

समुद्रातील मासे गळ टाकून बसणारे मासेमार, त्या गळाला लागू नये म्हणून माशांनी करायची धडपड, सांगूनही समजणार नाही. आता ३५ वर्षे खोलखोल समुद्रात पोहून आता मी Fishtank मध्ये आले तर मला करमत नाही. इतर बायकांची भिशी आहे, पण मी आता या वयात भिशी करू? नाचाचा क्लास लावावा तर काम करून पाठदुखी, कंबरदुखी लागली आहे. बाग, निसर्गा बद्दल म्हणाला तर १×४च्या गॅलरीमध्ये मी किती निसर्ग आणू? फायद्यासाठी, कुठल्यातरी फालतु, त्यांच्याकडे मिळेल अशा स्टेटमेंटसाठी सुद्धा ब्रान्च मॅनेजरला वेठीस धरण्याच्या, त्या OFFICE च्या वृत्तीमुळे कायम फोन खणखणत असायचा. आज शेवटी कंटाळून मीच लॅन्डलाईनवरून मोबाईल वर फोन केला व माझ्याच फोनचा Ringtone ऐकला. मानपाठ एक करून पेपरवर्क व कम्प्युटर दोन्ही? त्या भाकड मेहनतीला कंटाळून स्वल्पविराम मीच दिला. पण आज नुकसान माझे झाले पुढे काय? पुढे भविष्यकाळ आहे, एकटेपण आहे, ह्या छोट्या, सुरक्षित पण तोकड्या फिश टँकच्या भिंतीवर शेपटी आपटते, पोहायला नको. कस्तुरीपक्षी अंनीर उंबर, नारळाची फुले खातो. इतर किटकांना पक्ष्यांना मारत नाही. तरीही त्याची हत्या होते ती. त्याच्या रंगीत पीसांचे मुकुट लग्नप्रसंगी घालता यावे म्हणून! शिवाय त्याच्या कातडीचे मऊ जॅकेट नववधूला शुभ मानतात. रंगीत प्लास्टीकची पिसे वापरायला काय हरकत आहे. कृत्रिम फरचे कपडे हल्ली वापरतात तसे! इतरांच्या शौकासाठी कस्तूरीपक्षी महाग दिला तरी खूप पैसे घेऊन पिंजऱ्यात कोंबला जातो. आता स्कोप नाही व धमक्याही नाही. कामाच्या याद्या केल्या पण कामे पुरवायची होती. आचार्य अत्रे सा. मंडळाचा ११ वा वर्धापन दिन ११/४/१२ रोजी संपन्न झाला. तिथे गेले.

इतिहासाची वर्तमानाशी नाळ जोडण्यासाठी

संतांच्या भक्तीचा शिवरायांच्या शक्तीचा

आणि वीर सावरकरांच्या प्रखर राष्ट्रभक्तीचा

शब्द स्वरमयी स्वतंत्रते भगवतीचा!

जीवनाचा रस मधचोख्या सारखा शोषू लागले. कचऱ्याचा डेपो सारसबाग बनू शकतो. पूर्वी गर्दुल्यांची बाग असलेले जिजाऊ उद्यान आज कट्टा ठरले आहे. माझ्या मलाच लाख-लाख शुभेच्छा दिल्या! ओमा नमोजी आशा! जीवनाचा हा कट्टा म्हणजे आहे Open to sky, राजकारणा विरहीत समाजकारण होते.

''नात्याची नाळ सहजासहजी तुटत. नाही कट्ट्यावर आल्याशिवाय चैन त्याला पडत नाही.'' वेगळ्या पद्धतीचे बोलावे, करमणूक खूप झाली. म्हणून कुठेही वैचारिक कार्यक्रम असेल तर जाते. २४ तास करमणूकच, देशाचेच हसे झालेय हे विषारी सर्कल संपवायला हवे. भगवा ध्वज त्यागाचा असतो. भोगातून बाहेर यायला हवे. आज समाजाला नको त्या गोष्टींची गोडी वाटते आहे. ह्या झोपलेल्यांना जागे करण्यासाठी, यशस्वी होण्यासाठी कुणाशी तरी लढावेच लागते. कुठलाही देव निःशस्त्र नाही. मला ही शस्त्र हवे. ते शस्त्र म्हणजे लेखणी? माझी लेखणी सांगते, वस्तुस्थिती सांगा, सत्यापासून किती पळाल? वैचारिक व्यक्ति नको. खरेदी जमा हवी? अर्ध पोटी, दारू पिऊन, अर्धनग्न नट्या बघून समा डोक्यात जावून फक्त बलात्कारी बनू शकतात. दूरदर्शन विचारांसाठी नाही अविचारासाठी वापरले जाते आहे. परिवर्तनाची गाडी निघायला हवी. एक गाडी चुकली तरी हरकत नाही, पण सर्व गाड्या चुकून चालत नाही. परिवर्तनाची स्वप्ने बघणारी माणसे तयार

होणारच नाही? फक्त मतदार हवे का? उपभोक्ता Customer हवे का? खुषमस्करे, खिदळणारे हवे?

श्रीमंती व यश या व्याख्या बदलायला हव्यात? कोण ठरवणार? कोटा संपला? सखी सांगत असे. संसाराच्या पायावर फिरे वरवंटा, नाही शेतीवाडी. असा कसा लाभला भ्रतार करंटा. दारूची चटक, वखवखे करमणूकीचा अतिरेक शिवाय बोलायला कुणी तयार नाही तो तर मोठ्ठा आजार आहे. (प्रश्नाबद्दल)

क्षण तो क्षणात गेला हातचा सुटोन

पाय नाही घरापाशी सदा डोंगराची वाट,

आषाढाच्या पायी लागे तुकाराम नाथ

आंब्याची झाडे, मोहोराचा वास, सोनचाफ्याचा, करवंदाच्या फुलांचा वास वातावरण पवित्र करीत होता. काकू व मी पुन्हा गुरुंना भेटायला त्यांच्या आश्रमात गेले. खूप फावला वेळ मिळत नसे. पण निदान कुतरओढ तरी होत नसे. गुरुंशी चर्चा केली.

कधी कधी आपण मराठी म्हणतो ना ''वास्तू तथास्तु म्हणते तसेच एका देशात मकतुब म्हणतात, म्हणजे हे सर्व तुमच्या ईच्छेप्रमाणेच घडते आहे, देव तसे करो. नदीचे पात्र अडवणे नेहमी शक्य होतेच असे नाही. णग एखाद्या क्षणी बांध तोडून आपले मन चाकोरीबाहेर धावून येते. तसे माझे लिखाण होऊ दे.'' णी ''सोन्याची संधी मिळताच संधीचे सोने करता येतेच असे

नाही. तो सोन्याचा दिन होवो. सक्षम मी. आरक्षण हवे, वगैरेशा गोष्टी करणाऱ्यांच्या अर्धवट ज्ञानाचे नवल वाटते'' गुरु म्हणाले.

''Half knowledge is dangerous'' काकू ''ॲगाथा ख्रिस्तीच्या कादंबऱ्या वाचा. ८ कादंबऱ्या तिने तीन वर्षात लिहील्या, ज्या पडून होत्या. ८ वी कादंबरी संपादकाला आवडली. तो म्हणाला ''तुमच्या इतर तीन कादंबऱ्या प्रकाशित करतो'' ॲगाथा नम्र होती. तिने सर्व कादंबऱ्या दाखवल्या.

''संपादकाला सर्वच कादंबऱ्या आवडल्या व आठही कादंबऱ्या प्रसिद्ध झाल्या.'' - गुरुजी.

एक पोडकट नावाचे गृहस्थ म्हणाले – ''पण ती तिची स्टोरी चटकन आनंदी लिहू शकत नाही.''

''जे पिकते ते विकावे असे मला वाटत नाही. समाजाला जे हवे ते मी देईन, वाट्टेल ते मी देत नाही. समाजाच्या आरोग्याला जे हवे, जे योग्य आहे ते मी देते.'' – मी

''हरकत नाही लिहीत जा, चालती हो, सहली कर, पर्यटन कर. आयुष्य घालवणे म्हणजे रस नसलेल्या कामात दिवस काढणे नव्हे.'' गुरुजी

परतीच्या प्रवासात सर्वचजण गप्प होते. विचार हे बीज असतात. सर्वच बीज रुजतातच असे नाही.

पेन्शनच्या ऑफिसमध्ये गेले. सारे जरी ते तसेच होते मी मात्र आता उपरी बनले होते. एका क्षणाला वाटले. रडूच कोसळेल, पण परतीची द्वारे बंद झाली आहेत. नवीन खिडकी दिसत नाहीय. मनावर वारा धडके मारतो आहे, दार बंद आहे. नोकरीवर असो किंवा नसो वेळ जातच असतो. नाती बदलती, माणसे वेगळी असतात, कुणी हळवे, कुणी कठोर, कुणी अधाशे, कुणी अधीर. पण त्रास करून घेणाऱ्याला त्रास होतो.

''आरोग्यम् धनसंपदा'' पण मी एका दिवसात फिटनेस फ्रीक तर बनू शकत नाही ना! पक्ष्यांची शीळ ऐकून पाय थबकून मागे वळून बघणारी, मी आज आळसावले होते. करमणूकीच्या अतिरेकाचा मला पूर्वीच कंटाळा आला आहे. ''जाऊ दे ना घरा, कोंबडी पळाली'' असे ते कार्यक्रम मला आवडत नाहीत. Once a boy met a girl वगैरे कथा मला सुचत नाहीत. संसाराचा व्याप कमी झाल्याने वेळ मिळाला की बाई जे लिहीते ते खपेल असे नसते. ''Fishtank वर धूळ साठू लागली आहे. मी त्या काचेला नाक लावून बाहेरचे जग बघू इच्छिते आहे.'' मी

सखी : ''वेळ मिळाला आहे तर सर्व शस्त्रे परजून ठेवावी म्हणून अभ्यास सुरू केला तर ?''

मी : देवाची इच्छा बघू. मकतुब IBN शब्द संपत्ती वाढवून ठेवावी. एक शब्द पुन्हा आला की समजावे लेखक कशात तरी अडकला. गोष्ट फक्त प्रमुख पात्रांचीच नसावी. इतर पात्रांवरील परिणामसुद्धा गृहीत धरावा; कुणालाही गृहीत न धरता लेखन करावे. आपण खचतो, हळवे होतो म्हणून घाबरतो. चांगल्या माणसाला त्रासच होतो. वाईट माणूस मात्र धीटपणे पुढे जातो.

सखी :

कोणत्या संभ्रमात मी आहे

वारलो की हयात मी आहे

जागा आहे की झोपलो आहे ?

इतरांना फक्त काम हवे

मला नक्की काय हवे ?

मी : कुणालाही काहीच फरक पडत नसतो. माझ्यानंतर लंगडे घोडे आले. त्यांना संस्था पांगुळगाडा देत होती, त्यांना चालायला मदत करत होती. मी मात्र हद्दपार झाले होते.

सारे जरी ते तसेच

मजला सलते कुठे

मी ही तोच तूही तीच

निती आज ती कुठे ?

संध्याकाळ झाली. लाल सोनेरी आभा पसरली होती. पक्षी घिरट्या घालत रस्ता शोधू लागते. अलिबागला सुद्धा सुंदर सुर्यास्त दिसायचा. लाल सोनेरी सूर्य बघत पान

लागल्यासारखी मी बसूनच राहीले. अंधारलेल्या घरातून एकेक दिवा लागू लागला. आया मुलांना त्यांच्या पाळणाघरातून शाळांतून घेऊन घरी परतु लागल्या.

एरवी हजार पेन असतात, आज लिहायला पेन सापडेना. पेन्सिलने खरवडले काही तरी, की खरडले? काळे ढग नारळाच्या मागे तुरळक दिसू लागले. नारळे डोलत होती, सर्व शांत होते. माझ्या आयुष्यात मात्र त्सुनामी आली होती. ''सांज ये गोकुळी सावळी सावळी'' अशी ती जुनी गाणी जुनी होवून ''वाट बघतोय रिक्षावाला''ची आरोळी हल्ली संध्याकाळी येते. शुभंकरोतिचे स्वर घराघरातून कधीच हद्दपार झाले आहेत. आजी आजोबांनाच दूरदर्शनची चटक-मटक लागली आहे. मुले कार्टुनमध्ये रमली आहेत.

कोणे एकेकाळी या भारतात सकाळी अमरभूपाळीचे स्वर ऐकू येत असत. हे खरे वाटणार नाही अशा कलकलाटात या देशी सकाळ उगवते. वर्तमानपत्रात हेडमास्ट, हेडलाईन नसते तर हेडअॅड, मोठ्ठी जाहिरात असते जो दिवसाचा शुभारंभ होतो व करतो. पुढे बातम्या वाचूनही भिती वाटतील अशा असतात. रात्रीच्या गर्भात हुक्का बार व उषःकाली होणारे अपघात या देशाला कुठे नेत आहेत? स्वतःच्या मुलीला मारणारे ''बाप'' या देशात कसे व कुठून येऊ शकतात हे जाणून घ्यायला २×२ फूटाचा तो टीव्ही लावा. अभ्यासासाठी दिवा लावायला न पुरणारी वीज न वाचवता टीव्हीसाठी वीजेचा अपव्यय होतो आहे. कामाचे अनेक तास वाया जाताहेत. पिढी घडत नाही तर त्या Idiot Box ने बिघडते आहे. भोग, मजा करणे याची साथ आली आहे.

घर नवे वाटावे सजवावे म्हणून घरासाठी भारी पडदे खरेदी केले. त्या पडद्याआड मी बाहेरच्या विश्वाचा स्पर्श दडवू इच्छित होते. ही house-arrest मी किती काळ सहन करू शकते?

मला या घरी सुख बोचत होते का? स्वच्छतालय नसलेल्या शाखेत मी एक वर्ष काढले. समज कमी असलेल्या इतरांमुळे माझे जीवन उदास रस्ता बनले.

नवागावला पूर्वी कामावर जायचे म्हणून बाहेर रोजच पडत होते. पण ते बाहेर पडणे नव्हते. घाईघाईत एक काम आटोपले की दूसरे व दूसरे आटोपले की तिसरे. त्यात माझी धावपळ असायची. घड्याळात किती वाजले ते बघत तोंडात कोंबायचे, पोटात भरायचे व पळायचे. तेव्हाही मी बिनताकदीची बाईच होते. एखादा विचित्रसा दिसणारा ग्राहक आला, दरवाजा खुट्ट झाला, कुणी आवाज चढवला की भिती वाटायची. पूर्वी ज्यांनी बलात्काराच्या धमक्या दिल्या ते इथेही येऊ शकतात. सुरक्षितता ही एक भ्रामक कल्पना आहे, वेळ येईल तो गेला. नवीन आलेल्याने काहीही काम केले नाही. त्याला शाखेत पाऊल टाकायचा सुद्धा आत्मविश्वास नसला तरी तो वेळ मारुन नेत होता. कारण, तो पुरुष होता. काम न करता वेळ काढणे हा त्याचा जणू हक्कच होता. त्याने कर्ज मंजूरी केली नाही तरी तो कारणे सांगत होता. मात्र मी बाई होते व हिंसेच्या राजमार्गाने बाईला अधीन ठेवणे सोप्पेच असते. जो राजमार्ग संस्थेत वरिष्ठांनी व ग्राहकांनीही स्वीकारला.

पगार वेळेवर मिळत होता हा मोठा प्लसपॉईंट होता. इंगळे खोटेपणा करून ६ महीने रजा घेऊन वेळ काढू शकत होते; इंगळे कामात डल होता.

''मला अपघात झाला'' – इंगळे

''कुठे'' मी

''पनवेलला तिथून मी घरी आलो'' इंगळे

पनवेलहून संस्था जवळ होती. पण त्याला घरीच जायचे होते. तो संस्थेत यायला निघाला की नाही ही गोष्टसुद्धा संशयास्पद होती. जर त्याला पनवेलला अपघात झाला तर टोलची पावती बसचे तिकीट, काही पुरावा त्याने द्यावा, पण मॅनेजमेंटला काही पडली नव्हती. रजा मंजूर केली काय आणि अपघाताच्या बहाण्याने त्याला घरी बसू दिले काय, संस्थेची वाट त्याला लावायची होती की मॅनेजमेंटला?

मी त्या संस्थेत मिसफिट होते. मला संस्थेबाहेर करून त्यांनी विजयोत्सव साजरा केला. नाहीतर संस्थेला माणसे कामासाठी थोडीच हवी होती? सरकारी ऑफिस होते ना!

People leave bad bosses not jobs. What happened in my case I quit job & bad boss is enjoying at BKC.

धर्म वेगळे असले म्हणून काय? मत माऊली. माऊंटमेरी दोन्ही देवी एकच तर आहेत. माऊली सापडली तर, गॉडफादर मिळाला तर करियर चांगले होवू शकते. अनेक कट्टे वरिष्ठ नागरिक संघ, अशा ठिकाणी जायची सवय होती. माऊली प्रतिष्ठानतर्फे वैद्यकीय तपासणी शिबीरांना गेले होते पण खूपखूप कंटाळाच भरून आला होता. अपयशाची बोचणी, सल उरला होता.

आई बद्दलचा एक कार्यक्रम केला. मग माझी शाळा काही कार्यक्रम केला, पण म्हणावे तसे यश येत नव्हते. करियर करायचे वय निघून गेले होते. मनाच्या कॅलीडोस्कोपमधील चित्रे काही क्षण टिकणारीच होती. फीलगुडचे फिलींगसुद्धा येत नव्हते. बरेच दिवस मी पळत ट्रेन पकडत आहे व हॅण्डलला धरलेला हात निसटून पडते आहे असे स्वप्न मला पडत असे. प्रवाहातील माझी गाडी

चुकली होती का? ट्रॅक बदलावा का? की हॅण्डलमधला हात निसटला होता का? गोष्टी इतक्या विचित्र थराला जातील असे कधी वाटलेच नव्हते. की माझे जंक्शन झाले होते का?

ज्योतिष ग्रह, तारे, बुवाबाजी यावर विश्वास होता, पण मी कधीही त्याच्या आहारी गेले नव्हते. हायवे सोडून या अनिश्चित वेड्या वाकड्या गल्ल्यांत आले होते. गॉडफादर मिळावा? आकाशांसारखे विशाल व ईश्वराचा अंश असलेली आ•ई = आई ! कुणीतरी गॉडमदर तरी मिळावी? की हल्ली मातृत्वाचा भाव ठेवणाऱ्या गॉड मदरच उरल्या नाहीत? उरल्या आहेत, शुष्क खोट्या दिखाऊ मालिकांमधल्या सरंजामे मॉँसाहेब कुटुंबीय? काहीही करा अट्टाहास कंटाळा उरतो! इन्सान परेशान उधर भी इधर भी? नोकरीत सुद्धा, नोकरी बाहेर सुद्धा?

बिनपैशाचे मिळतात म्हणून शब्द स्वस्त? शब्दांची ताकत कुठे गेली? की शब्दांची किंमत स्थानावर, स्थळावर, रचनेवर, कागदावर अवलंबून असते. ब्लॉगवर लिहावे का? काही मासिकांचा फोन आला कथा पाठवा. अजून माझ्या या कथेचा शेवट व्हायचा आहे. पाऊल थकले आहे. वाटचाल चालू आहे. फोटोपुरती समाजसेवा करणाऱ्यांमध्ये मी कितपत समाजसेविका म्हणून टिकू शकते? कथा पुढे सरकत नव्हती. सुरुवात मध्य व क्लायमॅक्सशिवाय काहीही रंजक वाटत नसते.

शेवट काय करावा?

वरिष्ठ नागरिकांच्या एका संस्थेत जायचे होते, पण पायच चालेना कितीतरी वेळ बसस्टॉपवर बसून राहिले. काकू त्याच कार्यक्रमाला चालल्या होत्या. त्यांच्याबरोबर गेले. भाषण ठोकले. वरवरचे विचार व आतली गडदता याच संबंध असतो का?

परत येताना काकूंजवळ मी माझ्या नैराश्याचा विषय काढला.

'माझे करियर संपले' – मी

''हे तुझे करियर कुठे होते? तू पदोन्नती नाकारली होती. तुझ्याबरोबरच अनेक लोक पुढे गेले होते व तू आता उरलेल्या ७ वर्षांच्या नोकरीत फारसे यश मिळवू शकणार नव्हतीस.'' काकू

''नोकरी सोडली'' – मी

'पोटाचा पगार संपला पण चार दिवस चार घरचे धुणे-भांडे करून पैसे मिळवणे व ही तुझी नोकरी यात काही फरक नव्हता. तुझी वैचारिक बौद्धिक भूक त्यातून भागत नव्हती' – काकू

''संगणक माऊस पकडायची लायकी नसलेले पुढे गेले. पैकरला स्वतः काहीच येत नव्हते. शिकायचे नव्हते. तो सुद्धा ऑफिस ऑर्डरचे आयुध वापरून मला राबवत होता. नेहमी माझाच बळी का?'' मी

''देवाने तुला वेगळे काम सोपवले आहे ते तुला करायचे आहे.'' काकू

‘‘खरे तर माझ्याकडून शिकून इंगळे व्यवस्थित काम करू शकला असता पण स्वत:चे वर्चस्व दाखवणे ही त्यांची मॅनेजर पॉवर; मॅनेजरने काम करायचे नसते असे म्हणणारेच या संस्थेत पुढे गेले’’ –मी

‘‘तरीही तू त्या संस्थेच्या सुटण्याचे दुःख करतेस ?’’ – काकू

‘‘वेळ जात नाही’’ मी. त्यांना मी माझे कस्तुरीपक्षी वेड सांगितिले.

‘‘वेळ जात नाही म्हणून तू त्या ताणात, तणावात रहायला हवे होते असे मला वाटत नाही.’’ काकू

‘‘आरोग्यासाठी काही करू म्हटले तरीही वेळ उरतोच. सगळीकडे माझ्याबरोबर यायला कुणी रिकामे नसते.’’– मी

‘‘एखादी परीक्षा दे. MSW, Journalism, MA’’ – काकू

‘‘मला शिकायचे आहे मार्कार्थी व्हायचे नाही’’ – मी

‘‘ज्ञानसाधना कॉलेजला जाऊन तर बघ’’ – काकू

‘‘मला काहीतरी वेगळे करायचे आहे’’ – मी

‘‘जगात प्रत्येकच व्यक्तिला काही तरी वेगळे करायचे असे पण शेवटी तो त्याच त्या चाकात फिरतो.

तुलासुद्धा चाकोरी सोडल्याचे वाईट वाटते, आहे ना!'' – काकू

''म्हणजे मी चाकोरीतच ठीक होते का?'' –मी

''आता परतीचा मार्ग उरला नाहीय, चाकोरी सुटलीय, काही तरी वेगळे कर.'' – काकू

मी सखीबरोबर ग्रामसुधार सेवाभावी संस्थेत जाऊ लागले.

समाजसेवेसाठी एका आदिवासी पाड्यावर भेट दिली तेव्ही मी म्हणाले – का होऊ देतात लोक एवढी मुले?

सखी : ''आपापले कुटुंब मुले ती होवू देणे, न देणे हा ज्याचा त्याचा खाजगी प्रश्न असतो. मात्र आता देशातील मुलींची संख्या ८ ९८ मुंबई प्रति १०००ॲव्हरेजपर्यंत खाली आली आहे. त्यामुळे हा प्रश्न आता सार्वजनिक झाला आहे. PVPNDT हा कायदा १९९४ साली अस्तित्वात आला. सोनोग्राफीने अजात बालकाचे लिंगनिदान करण्यास व सांगण्यास या कायद्याने बंदी आहे.''

मी : कोल्हापुर जिल्ह्यात Sonogram चे ऑडिट करण्याची पद्धती सुरू झाली, मात्र त्याला पळवाटाही निघाल्या. तीस डॉलर देवून घरच्या घरी लिंगनिदानाचे साहित्य मिळेल अशा जाहिराती देणाऱ्या Website आहेत.

(Timecity 15/1/2011)

उदा : वीस आठवडे वाट कशाला? सहा आठवड्यातच मुलांच्या लिंगाचे निदान करा.

सखी : ''९२ टक्के सत्यता'' अशा जाहीराती असल्या तरी शास्त्रज्ञांच्या मते त्या चुकीचा दावा करतात. अर्थात अशा प्रकारे मुलींची हत्या हा खूनच असतो. बीटा HCG च्या हार्मोनच्या तपासणीने गर्भधारणा समजते मात्र लिंगनिदान होवू शकत नाही. शिवाय अशा वेबसाईट्स बंद करणे आवश्यकच आहे. मात्र लोकसंख्या वाढ थांबवायला हवी.

मी : देवाचा शोध घेत, देव म्हणजे देवघेव, म्हणून मांत्रिकांनी कमवले. मुलगा व्हावा म्हणून आता वेबसाईट्स कमावतात. भिती Encash करतात. अंगठ्या, खडे, स्वर्ग-नरक, पोथ्या, लॉकेट्स, यंत्र, फेंगशुई, पिरॅमिड्स, कवच, मुलगा होण्याचा याच्याशी संबंध आहे का?

सखी : जेव्हा एखादी गोष्ट प्राप्त करण्याची तीव्र इच्छा होते तेव्हा ती इच्छा पूर्ण करायला जगच प्रयत्न करते. प्रयत्न केल्याशिवाय यश मिळणार नाही म्हणून अशा पोकळ स्वप्नांची शिदोरी घेऊन एक फौज बाजारात उतरते. जादुगार टोपीतून ससा काढत नाही तर तसे दाखवतो म्हणून हुशार आहोत असे दाखवणे महत्त्वाचे ठरते. ते दाखवण्यात हुशार असणे अभिनय करणे महत्त्वाचे असते.

मी : आपल्याला ग्रेट वाटावे म्हणून जेव्हा पैसा असतो तेव्हाच काहीतरी विकणारे समोर येतात. त्यांचे लक्ष व लक्ष्य आपल्या खिशावर असते. इतके दिवस वाटायचे एवढा ताण घेवून आपण झोपेत वर जाऊ. आता वार्धक्याची भिती वाटते. सत्तरीचे वृद्ध बघ.

सखी : थकलेले आजारी बघून वाटते आयुष्याचा हाही रंग? तर कधी कधी १०० वर्षांचे दत्ताजी ताम्हाणे स्वातंत्र्य युद्धाच्या आठवणी सांगतात तेव्हा भरुन येते.

''खरेचच हे वर्ष खडतर जाईल का? की नाट लागली? जाशील कुठे? येथील आमच्याकडेच म्हणत मुद्दाम कुणी माझ्या प्रगतीला खीळ घालत असेल का? असे कितीजण असतात Top career व Talent वाले, पण Sucess is a chance काही हिरे खाणीतच राहतात.'' – मी

कार्यक्रम बिनसला व एका परिने झाले ते खूप चांगलेच झाले. अपयशी कार्यक्रमाची कलाकार असे माझे नाव झाले नाही. पण मी तो कार्यक्रम अपयशी होऊच दिला नसता. ''एवढे काय कौतुक असे बोलणे-वाचणे काय कुणीही करेल'' म्हणणाऱ्यांना कळेल की कोणाचे पाऊल कुठल्या उंबरठ्यापर्यंत आहे. सखीला निरोप देत मी म्हणाले,

''अब थोड़ी देर में हम जुदा हो जाएंगे

मंजिल मिले ना मिले रास्ते जुदा हो जाएंगे

मैंने तो वही लिखा जो कुछ लिखाया आपने

सखी : माळा गुंफणारा धागाही महत्त्वाचा असतोच. माझे करियर नक्की कोणते? भाषेवर प्रभुत्व नसणाऱ्यांना सुत्रसंचालन अवघड जाते. जे काम करणार ती कला तिच्यात प्रवीण व्हा! ''कुठल्याही प्रश्नाला इन्स्टंट सोल्युशन नसते. त्यासाठी काही काळ जावाच लागतो.''

मी : तोपर्यंत मन एक जुन्या पुराण्या ऐतिहासिक आठवणी, पौराणिक जखमा गोंजारुनच ठेवते. अगदी पुराण वस्तू संग्रहालयाप्रमाणे प्रदर्शन करून त्या जपतो.

''कॉर्पोरेट ऑफिसेस, वाचन कट्टे व चव्हाटेसुद्धा काही काळ तरी नोस्टॅल्जीकच राहतात. स्मरण रंजनातच रमतात. अजूनही समाजात सोयीसाठी थोडा बदल स्वीकारून परंपराच जपली जाते. सुवर्णाक्षरी भारतीय संस्कृती अशी मनात कोरलेलीच असते. उंबऱ्यावर आधुनिकता उभी असते. हल्ली घरांना उंबरेच नसतात अशीही टीका मध्ये वाचली.'' – सखी

''निराशेचा, पार्शलीटीचा रोगच समाजाला लागला आहे'' – मी

''ती जगाची रीत आहे.

दिये को सूरज कहते हैं

ऊपर के सूरज को दिया कहते हैं

सखी हसत म्हणाली.''

To live the life

To win our life

To find its meaning

And the fire to light

To do what's right

And till the end to fight ''

मी कविता ऐकवली.

नवा इंगळे म्हणतो, ''मी कर्ज मंजूर करायला नाही म्हणतो ? मी पूर्ण पैसे देणाऱ्यांचेच करीन. खाते उघडायला हो म्हणू नका, उगीचच कामाचा कचरा वाढवायचा नाही. इतरांनाच सर्व काम देतो. शिवाय मग मी डिपॉजिट कसे वाढवणार व लोन कुठून देणार ? म्हणतो. हा रुटीनच टार्गेट कसे करणार ? शिवाय त्याच्या मायावी भाषेला सगळे फसतात. पण टिकून राहिलो. नोकरीत मी माणसांना कधीच ओळखू शकले नाही. जग पैशाचेच भुकेले असते. स्वार्थ माणसाला अगदी खालच्या थराला नेतो. संवाद कसा साधायचा ? त्यात तब्येत कशी सांभाळायची, संकटात शांत कसे रहायचे ? मला आजही समजेना ! नीलमोहोर, यौवनाचे फुल वगैरे टोपण नावे मला भुलावत नसत ! मला त्यात रस वाटत नसे. रिकामी घरटी बघून मनात आर्त दाटून येते, नाजूक पंखाचे पक्षी किती दूर उडणार ?

मटा व लोकसत्ताची स्वप्ने पूर्ण होणे सोपे नसते. शोभा डे चा आदर्श ठेवायला काय हरकत आहे ? इंग्रजी Global आहे ? भारतीय संस्कृतीसुद्धा आता बदलते आहे. मॉडेलस् नट लिव्ह इन वगैरे येत आहे. म्हणूनच तर लोक अशाच गोष्टी चवीने वाचतात व म्हणून त्याच विषयावरील गोष्टी विकतात. काय विकायचे, कसे विकायचे ते ठरवूनच वाद घडवले जातात. उदा. नथुराम, महात्मा माझ्या कस्तुरीपक्षी बद्दल बोलायचे तर हा विषय आवडणे अवघड होते. गूढ

आवडते व शेवट गोड आवडतो. मूळ कलाकृतीची नक्कल बघा! लोकप्रभा, DNA blog ... All dimention वाचा व विचार करा. मैत्रिणसाठी मुलाखती घ्या. Anchor story ves Branding होते.

मुलाखत घ्या. निवेदन करा, बोलते करा असा वैचारिक प्रवाह वाहतो. कार्यक्रमाला जा. पुण्यनगरी - सई - लोकमत - सखी-सामना-उत्सव-सकाळ-मधुरांगण हे अनुभव शिकवतात. विकास हवा तर प्रयत्न करा. विषय ठरवा. १५ भाग एकाच विषयावर लिहा!

उदा. पर्यावरण, पक्षी, झाडे, दूरदर्शनचा नाते संबंधांवरचा परिणाम.

उदा. स्त्री, सत्यमेव जयते, भाववाढ;

लोक कार व पैसे यावर खूष असतात, फारसा डोक्याला त्रास त्यांना नको. तुम्ही आपल्या क्षेत्रात अनुभव येत असतो तो सांगा. यश येवो न येवो लिहा. मी सामना पुरवणीत मैत्रिणमध्ये सर्वांचा संपर्क साधला. विनोदी लिहा, त्याला मागणी असते म्हणतात – ''चाहिये थोडा प्याज भाजी में थोड़ा प्याज'' अशी कविता लिहुन पाहिली. पाऊलवाट शोधली. किचन लॉक करणे, स्वयंपाकघराला कुलूप लाव तरच वेळ मिळेल. असाही विचार केला, पण जमेना. आपण लेखक कोण असतो? पक्ष्यांशी, झाडांशी आपण मैत्री का करतो, मैत्री म्हणजे काय? हे कोण लोक जीवनात कशासाठी येतात, किती टिकतात? एकमेकांबद्दल आदर असतोच असे नाही, प्रेम तर नाहीच नाही, पारदर्शक विचार नाही, मग नाते म्हणजे काय? ते ऑफिस की कुरुक्षेत्र! एखादा गुरु मिळाला तर सोनेच! तो सर्व प्रश्न सोडवतो. बाकी बघू बघू करणारेच! त्याची परिस्थिती हॅण्डल

करण्याची कपॅसिटी २००% मार्क द्यावी इतकी असते, पण असा गुरु मिळतोच असे नाही. प्रश्न सुटतातच असे नाही. उलट उथळ मध्यस्थ ते प्रश्न बिघडवतात.

उन्हात निखारलेली खडी फुटता फुटेना,

स्तनाला चिकटलेले मुल सुटता सुटेना,

बाई फुटतच राहीली,

बाई फोडतच राहीली,

आतून फाटतच राहीली

आश्रमात वातावरण चांगले होते पण जाता येता तर तीच वाट असते ना! जुन्या जखमांवरची खपली काढणारी वाट!

''गुरुजी मला काहीच करावेसे वाटत नाही'' – मी

''सकाळी प्रार्थना दुपारी प्रार्थना'' – गुरुजी

''निष्क्रीयता भरलेले लोक काहीच करीत नाहीत. तसेच हे प्रार्थना करणे मला वाटते. ज्ञानेश्वरीत देव प्रत्यक्ष बोलतो. पसायदान धीर देते व जीवनाची स्वच्छ जाणीव व जगण्याची प्रवृत्ती शिकवते.'' प्रार्थनेत वेळ का वाया घालवायचा.'' – मी

पुरुषांच्या दृष्टीने मी फक्त एक बाई होते. ओझं वाहणारी. सोन्याचा मुलामा घेवून वावरणारी, सौंदर्य प्रसाधनांनी झाकलेली. आईच्या वयाची असले तरीही! संस्था सोडली तरी कांडे मागे-मागे येई.

त्या सोनेरी, पिवळ्या रंगाचे नाते घेऊन आलेली स्त्री पुरुषांसाठी नयनोत्सवच असते, तिला मन नसते. ती थकली आहे कळले तरीही ती कोसळण्याची वाट पाहणारे नराधमसुद्धा असतात. अनियंत्रित अशी ती साखळी प्रक्रिया थांबवायला पुढे येणारे कुणीच नसते. बघे भरपूर असतात. त्या मातेला धन्यवाद द्यायला सुद्धा कुणी पटकन पुढे होत नाही. स्वतःवर वेळ आल्यावर, कुणीही मदतीला आले नाही म्हणणारे, स्वतः बघे अलिप्तच असतात. पर्ल हार्बर झालेले मन! मी सकाळी लिहायला घेतले की दिवसभर निराशा गडद होत जाई.

स्वप्नांचा कचरा वेस्ट म्हणून फेकू ?

डिटॉक्सीफाय झाल्यावर काय उरेल ?

घटना एखादा मिनिटच घडते

पण परिणामी कटुता चिरकाळ उरते

भूकंप काही क्षण होवून जातो

पडझड मात्र कायम राहते

उध्वस्ततेचे मोजमाप होते ?

पैसा देवून कल्याणकारी योजना येते ?

वायफळ सजावट वरवरची मलमपट्टी

उसासत राहते मी संपूर्ण एकटी

मला माझे जगू देत थोडे थोडे रे

इतरांशी माझी तुलना करू नका रे

पण एकाने हिरोशिमा केले म्हणून झाले

माझ्या स्वप्नांवर पर्ल हार्बरसारखे हल्ले

पर्ल हार्बरमध्ये मोती नाही की पडाव नाही

उंच इमारती उध्वस्त दिसतात

मनाचे तारु कुठे कुणाला कळतात ?

मी हिरोशिमा, मी पर्ल हार्बर, मी जैतापूर,

माझ्या ओठी उध्वस्त असा सूर

मी सेवानिवृत्त झाले. मागून आलेले लोक सिंहासनावर बसले. बिनताकतीची मी तर माझ्या दुःखात चडफडत, रडत नाराजीने वाट चालत होते. लिखाणाच्या क्षेत्रात खूपच स्पर्धा

असते. निबंध चांगला लिहीता आला तरीही वाटते आपण लेखक आहोत. मला माझी हत्यारे धारदार करायला आता वेळ मिळत होता, मात्र वेगवेगळे कौशल्य मार्गदर्शन वर्ग खूप महागले होते. रु. २५००/-, ५०००/-, १००००/- इतकी फी होती. मला त्यातून काही शिकायला मिळावे म्हणून मी एक क्लास लावला.

वर्गात माझे काही केल्या लक्ष लागत नसे. माझ्या डोळ्यातून उगीचच घळाघळा पाणी येई. संस्थेने माझ्यावर अन्याय केला ही गोष्ट काही केल्या मनातून जात नसे. माझे पोट मारले आणि स्वतः सर्वजण फुकटचा पगार खात असणाऱ्यांना गोंजारत राहीले हे सत्यसुद्धा बोचरेच होते. माझ्या कस्तुरब्याच्याही ऑफिसमध्ये माझ्या जागेवर जो श्री आला त्याला अजिबात काम येत नसे. शिवाय त्याचा अहंकार खूपच होता. मॅनेजरने स्वतः काम करायचे नसते, करून घ्यायचे असते, असे तो सर्वांना सांगत असे. तो ४ वाजता ऑफिसमध्ये येई व नंतर उशिरापर्यंत थांबण्यासाठी सर्वांना रागावे ओरडे, ऑफिस ऑर्डर काढीत असे. धंदा वाढवणे दूरच तो रुटीन कामसुद्धा टाळतच असे.

तासन्तास ग्राहकांबरोबर गप्पा मारून तो नंतर व्हाउचर बनवायला खाते बघायला इतरांकडे पाठवी, कारण त्याला ते सोपे काम पण जमत नसे. क्षेत्रीय कार्यालयात खूप मित्र आहेत, म्हणून तासन्तास त्यांच्याशी गप्पामारीत असे व कुणाला तरी फोन लावून याला विचारुन करा म्हणून इतरांना सांगत असे. मात्र स्वतः काहीही करीत नव्हता. ‘‘मला येत नाही’’ ही पळवाट त्याने स्वीकारली पण शिकून घ्यायची इच्छा नव्हती व तयारी नव्हती.

श्री सांगे की, ''डेप्योटेशनवर मला परत क्षेत्रीय कार्यालयात बसायला बोलावणार आहेत. तुम्हीच शिका व तुम्हीच ब्रान्च चालवा''. सहा महिने क्षेत्रिय कार्यालयात निष्क्रिय बसून तो पूर्वी पेक्षा अधिकच आळशी झाला होता. 'बाकी सर्व तिथे बसून मजा करतात, मला इथे टाकले, मी पण युनियन मागे लागून जाणारच आहे' अशी कुरकुर तो करीत असे. दिवसभर डेप्युटेशनसाठी फोन कर, फॉलोअप कर असेच काम तो ब्रान्चला आला तर करी. कधीकधी तर तो मुख्य गावी ब्रान्चलाच बसून राही व परस्पर घरी जाई. ब्रान्च अशीच चाले. भगवान भरोसे!

काजळी धरून, धुरकट कंदिलासारखी ती संस्था वेगळीच बनली. संस्थेच्या दिव्याच्या काचेवर धूळ आणि काजळी जमली आहे व अंधार होतो आहे. मी जेव्हा त्या ब्रान्चला माझा पगार काढण्यासाठी पोहोचले तेव्हा मी बहीरीमातेच्या देवळात जाऊन बसले. देव बहीरा असतो हा माझा ठाम विश्वास बदलू शकेल असे देव अजून तरी वागला नाही किंवा मीच ते जाणले नाही. देऊळ नक्षींनी सजलेला तो घाट मागे सोडून आम्ही आमच्या राहण्याच्या हॉटेलकडे चालू लागलो. वीज गेली व गाव अंधाराच बुडाला. अशीही संध्याकाळ नेहमीच जीव कातरुन टाकते. सांजभय मनात उमटते. संध्याकाळ ही चोरपावलांनी मनात शिरु लागली. तो इतिहासकालीन घाट गूढ वाटू लागला. सांध्यपर्व अंगावर झेपावत होते. मन घाबरत होते.

तो जागतिक वारसा दिन १८/०४/२०१२ होता. आजूबाजूची जीर्ण मंदिरे, पडके वाडे, भग्न वास्तूचे मूक निवेदन ऐकत बसून राहिले. मला फुकटचा पगार नको होता पण असह्य दबाव व नियमबाह्य कामे नको होती.

ज्या लांब शाखेतून मी बदलून आले होते तिथे माझ्या जागी आलेल्या बाईचा फोन आला. ‘‘वर्षभरात मी एकही कर्ज मंजूर केले नाही. लोक वाट बघून दुसऱ्या संस्थांत गेले. हात पकडून तर कोणी माझी सही थोडीच घेणार आहे? मी मजेत राहीन व नंतर मला क्षेत्रिय प्रबंधकच व्हायचे आहे. इतरांना कामाला लावायचे व आपण फोनवरून शेळ्या हाकायच्या. तू मूर्ख, नोकरी सोडायची वेळ आली. काम टाळायला कौशल्य लागते. काम केले काय न केले काय, पगार तर तोच मिळणार आहे.’’ इतर बरीच माहिती तिने विचारली. जी समजावून सांगताना माझ्या तोंडाला फेस आला. जी तिला समजणे शक्य नव्हते.

माझ्या डोळ्यादेखत, मी ज्या दोन शाखा सोडून आले, त्यांची वाट लागलेली मी पाहिली. मग मलाच ‘बळीचा बकरा’ का म्हणून बनवले? की वरपर्यंत सर्वांचीच ‘‘पगार मिळतोय ना बसून खा’’ही वृत्ती होती.

माझ्यानंतर आलेल्या इंगळेने रजा घेतली. रजेतच त्याचे ग्रामीण मोफीसील रुरल सेवा पूर्ण झाले. तो पुरुष होता ना, त्याला कुणी विचारणार नव्हते की बलात्काराच्या धमक्या देणार नव्हते. अपघातानंतर क्षेत्रिय कार्यालयातील झुलती खुर्ची त्याची वाट बघत होती. नाश्ता जेवण बसून कसे पचणार? म्हणून एक तास फिरुन येणारे क्षेत्रिय कार्यालयातले कर्मचारी. ब्रान्चेसचे प्रश्न टाळत असतात. मध्यंतरी ग्रान्ट रोडला सुद्धा एका प्रबंधकाला धमक्या यायच्या तिने ही व्हीआरएस घेतली, नाईलाजानेच! माझी पेन्शन सुरू होईना.

पण ऑफिस इतरांचे प्रश्न कसे जाणणार? का जाणणार? स्वार्थ महत्त्वाचा असतो ना! शाखेत एकही अधिकारी नसलेल्या वीस शाखा असताना २७ अधिकारी क्षेत्रिय कार्यालयात

बसलेले होते. शाखेत ८ वाजेपर्यंत कामचाले. हे लोक १२ वाजता येत व लवकर घरी जात असत व त्यांना कशाचीच अकाऊंटॅबीलीटी नव्हती.

आराम करण्याचा एक राजयोग कुंडलीत असावा लागतो. कामचोरांची पेंडिंग कामे, माणूस पाठवून, त्यांच्याकरवी करून घेतली जात असत. मात्र काम करणाऱ्यावर अधिक काम लादले जाई. ब्रान्चला त्यांचा वाहन भत्ता देण्यापूर्वी बिझीनेस किती वाढवला विचारले जाई. मात्र क्षेत्रिय कार्यालयात एक तारखेला चार हजाराच्या आसपासच्या आकड्याचा वाहन भत्ता कर्मचाऱ्यांच्या खात्यात जमा होईल. ब्रान्चेसच्या त्या लोकांनी फॉलोअप केला नाही तर त्यांचा वाहन भत्ता कधीच मिळत नसे. माझा ३ महिन्याचा भत्ता मिळालाच नाही. खेटा घालून कंटाळले.

''कोलावरी डी''चे राज्य त्या आमच्याच नियंत्रण करणाऱ्या ऑफिसवर होते. मराठी माणसे शिपाई व झाडू मारण्याच्या विभागात होते व त्यांना सुद्धा मराठी माणसांचे काम करण्याची इच्छा नव्हती. पेन्शन वेळेवर 'न' देऊन ते माझ्या प्रश्नांकडे दुर्लक्ष करत होते. पेन्शनसाठी खूप पायपीट केली.

संस्था सोडून मी बाहेर पडले. मी कुणालाही सुधारु शकले नाही. मी गेल्यावर तर नंतरच अजूनच स्क्रॅप आले पण ते त्यांच्याच बॅचचे, युनियनचे होते. तोंडपुजे व हांजीकार होते, मी काम करूनच चूक केली होती ना! त्या माझ्या पोटावर पाय मारून काळ ही सोकावत होता व ही संस्था सुकत होती. काम करून कसे घ्यावे हे सर्वांनाच येत होते. पण स्वतः काम करायला कुणीच तयार नव्हते. एवढा पगार देऊन दोन माणसे मिळतील म्हणणाऱ्या व्यवस्थापनाला माझी उणीव

जाणवण्या इतकी प्रगल्भताच नव्हती. संस्थेचे दार बंद झाले ते मला! गैर व्यवहार करणाऱ्या, फ्रॉड करणाऱ्यांना नाही. सर्वच तहलका पोलखोल यशस्वी होत नाहीत.

सर्वच प्रामाणिक लाकूडतोड्यांना बक्षिस म्हणून सोन्याची तलवार मिळत नाही.

सर्वच हिरकणींचा सन्मान हिरकणी बुरुज बांधून केला जात नाही कारण आज शिवाजी महाराज पुतळ्याच्या रुपात उरले आहेत. पुरुषांच्या वृत्तीत नाही का?

एखादीच स्त्री अन्यायाविरुद्ध लढण्याची हिम्मत करते. शिवाय असुरक्षित स्त्री ही एकटी लढू शकत नाही.

झाशीची राणी झाली की तिला शहीदच व्हावे लागते. सर्वच कथा सुखांत होत नाहीत. व्हिलनला तलवारीने मारणारे हिरो व सूड घेणाऱ्या हिरॉईन्स चित्रपटातच असतात. प्रत्यक्षात अनेकजण प्रश्नापासून शेवटी पळूनच जाऊ शकतात. त्यांच्याकडे अन्य पर्याय नसतो. कुणाची साथ नसते की शहीद होऊन त्यांना मरायचे नसते.

चौका-चौकात इतके पुतळे उभे आहेत त्यात झाशीची राणी उभी असते. इथे ही कथा संपत नाही. ही कथा कुणीचीही असू शकते.

बिनताकतीच्या बायका समाजात अनेक आहेत.

पोखरलेल्या संस्थासुद्धा वेगवेगळ्या आहेत.

झाशीची राणी मूक अश्रू ढाळते आहे.

कोणी विचारेल जेव्हा

हरली कशी इथे ती

तेव्हा जरुर जाणा

लढली कशी इथे ती

महिलांना संधी मिळते असे म्हणतात, पण सुरक्षितता ?

सखी व मी अविकसित पाड्यावर औषधोपचार देण्यासाठी जाऊ लागलो.

पाऊस पडू लागला.

‘ए आई मला पावसात जाऊ दे’ मी गाऊ लागले.

सखी – ए आई मला ऊन्हात फिरू दे’ आम्ही हसू लागलो. रानवारा धुंडाळा लागलो.

भविष्यकाळ हा भूतकाळावरूनच ठरतो. अचानक येतो पण क्वचितच! घाई करूनही त्या नव्या चालू महिन्याची मागच्या महिन्याशी नेहमीच आस (Conection)असते व भूताला लागून गती कमीच होते. भजनांच्या एका ग्रुपमध्ये मी जाऊ लागले. त्या भजनांमधील आर्तता गाण्यातून स्वरातून ह्रदयात उतरत असे. देव धर्म भजने फसवणूकीचे दुःख - ह्यावर गीतेचे तत्वज्ञान गळी उतरवा हाच उपाय होता.

कर्मण्येवाधिकार - वंचना

नात्यातील वेदना - महाभारतातील गोष्टी

विवाहातील दुःख - रामायण

लोकोपवाद - सामाने सीतेला का सोडले ?

मृत्युचे भय - आत्मा अमर आहे ही सर्व painkillers ची औषधे घेऊनही माझ्या वेदना थांबत नाहीत. णी नास्तिक तर नाही ना ? मलाच नवे विचार अंगवळणी पडायला एवढा त्रास का होतो ?

मध्ये मध्ये पर्यावरणाचा पक्ष्यांवर होणाऱ्या परिणामाचा अभ्यास सुरू करते, परत ठेवून देते.

कस्तुरीपक्षी शोधत मी रानोमाळ फिरते, तो नीट दिसत नाही. सकाळी उगवत्या सूर्याच्या किरणांमध्ये किंवा संध्याकाळी रेंगाळणाऱ्या संधीप्रकाशात, अनोळखी रस्त्यांवर एक काळजीची कळ मनात उठे. पुढे काय ?

वर्दळीचे दिवस गेले आता 'फुरसत के रात दिन' झेपतील का ?

एके दिवशी पुनी भेटली. त्याने नीट बघून घेतले व नंतर बघून न बघितल्यासारखे केले व मोबाईलमध्ये काहीतरी बघितल्यासारखे केले व दाखवले. कदाचित हसेल, बोलेल असे वाटले होते पण पुरवणीच्या आधी मुख्य पेपर असावा लागतो व मुख्य पेपरच बंद झाला होता ना !

काहीतरी हरवल्यासारखे वाटले. अपॅथीची साथ या देशात आली आहे. ''गेलात उडत'' मला तुमची गरज नाही म्हणत सर्व चांगल्या लोकांना वाटेला लावायची सवय समाजाने स्वीकारली आहे.

असे पिठले भात खाऊन किती दिवस रहायचेय पेन्शन कधी सुरू होणार? शतक वर्ष आहे संस्थेचे म्हणून!

बाहेर ही बातमी पोहोचली तर Gossip व Media ला चर्चा करायला किती वेळ लागला असता. नोकरीच्याजागी होणारा लैंगिक छळ हे सत्यच आहे, पण तक्रारदाराला हतबल करणे ह्या उपायाने तक्रारी दाबल्या जातात.

जिथे जाईन तिथे पक्षीच का आवाज देतात? निश्चित समजत नाही. पक्ष्यांचे रंगरुप वेड लावते. मी म्हणजे एक वाट बघणे? मी म्हणजे पक्ष्यांची साद ऐकणारा जीव? मी म्हणजे एक कंटाळा? मी म्हणजे एक पराजय? मी म्हणजे दुर्बलांनी मानावी ती हार? मजबूरी? ज्या दिवशी माझा विजय होईल, त्याच दिवशी प्रभादेवीचा सिद्धी विनायक ते लाल जास्वंदीचे हिरव्या दुर्वांत सजलेले हार स्वीकारायला अधिक खूष होईल. कदाचित तो सुद्धा माझ्या विजयाची वाट बघत असेल. तो सुद्धा म्हणत असेल –

निर्बल से लड़ाई बलवान की

ये कहानी है दिये की और तूफान की

भालचंद्र नेमाडेंची, हिन्दु वाचली किती विषयांना स्पर्श करीत ते जीवनाचे तत्त्वज्ञान वहात होते. स्त्रीचे कमावतीचे, धावणाऱ्या मिळवतीचे, शोषितांचे कथानक कधी लिहीलेच जात नाही.

संन्यासी लोक ते संन्यस्त जीवन जगताना सुद्धा, मन, भावना, देह, आजार उपचार, भूक या बंधनातून सुटत नाहीत. त्यांची सुटका होते, ती फक्त मानवी सहवासातून, जन्मणाऱ्या विकारातूनच होते. ते संसारापासून पळून जातात पण म्हणूनच जगू शकतात. भक्ती हवी पण अधिनता नको. सकाळी अंगणात वेगवेगळे पक्षी येत. एक दिवस वाट चुकलेला भरकटलेला पक्षी आला. कसे वेगवेगळे रंग होते त्या पक्ष्याचे. रंगाचे फलकारे मारावे असे होते. त्याला नंतर वाट सापडली, तो उडून गेला असावा.

माझे पेन्शनच्या पैशांची व्हाऊचर सोडणे व त्यावर सही करणे टाळणे या निमित्ताने इंगळे पुन्हा सुट्टीवर गेला.

एका महिन्यात माझ्या त्या चार लाख व इतर यावर किती व्याज बुडत होते याची जाणीव त्याला नव्हती. तो फक्त काम टाळण्यातच मास्टर होता. त्याच्या त्या कामचोरीला त्याच्या त्या क्षेत्रिय कार्यालयातील मित्रमैत्रिणींची मूकसंमत्ति होती.

पदोन्नती हवी पण काम नको. पगार हवा पण जबाबदारी नको. गॉडफादर आहेत ना – त्यांच्या जीवावर ऐश करायची व कसे तरी दिवस काढायचे व नंतर नियंत्रक संस्थेत येऊन बसायचे. पुन्हा फक्त प्रमोशनच्याच वेळी शाखेत जायचे हे अशा चतुर लोकांनी बरोबर ठरवलेले असते.

त्यांना घेण्याचे, बिलांचे नियम बरोबर माहित असतात. त्यांना लागून सुट्टी आली की अपघात होतो, कुत्री चावतात. त्यांची सासू व जवळचे नातेवाईक मे, ऑक्टोबर व मार्चमध्येच सिरीयस होतात व मरतातसुद्धा!

वर्षानुवर्षे हे चक्र चालूच असते. कामचोरांच्या त्या वेळ काढण्याला वरिष्ठांचीसुद्धा मुक संमति असते.

Fools build houses for wise men to stay in them

Fools work in offices

For wise men to sit idle.

Think positive म्हणजे चांगलेच होते, हा विचार करा पण सांगणेच फक्त सोप्पे असते.

पेन्शन सुरू व्हावी म्हणून एका साहेबाला भेटायला गेले, अनेकांना भेटले. हा साहेब सांगायचा ''मी कुठे सांगतो तुम्ही काम करा. हाताखालच्यांना उल्लू बनवा आणि स्वतः मजा करा. आजारपण, अपघात योग्य वेळी येऊनच नोकरीतील कटुता टाळून जबाबदारी टाळायची असते. गाढवासारखे काम करणारे डिसमिस होतात.

ऑडिट क्लीन हवे, एकही कर्जच मंजूर करायचे नाही किंवा हाताखालच्यालाच सही करायला सांगायचे.''

दुसऱ्यांना चिडवण्यात त्यांचे रक्त उकळवण्यात त्यांना आनंद मिळे. काम चोरीची १०१ मार्ग हे पुस्तक हे लोक अधिक चांगले लिहीतील व काही संस्थामध्ये ते ँू एत्ती ठरेल. रोज फिरायला निघाले की एक निळी केशरी खंड्या विजेच्या तारेवर बसून शीळ घालत असे. तो पक्षी

जणू मला ‘खंड्या उठ विडी पेटव’’ या ऐवजी ‘खंडी उठ, लेखणी उचल’ सांगत असे. वेगवेगळ्या पक्ष्यांशी माझे पूर्वीपासूनच जमते. कबूतरे, कावळे, चिमण्या, पावशा, कोकिळा, घुबड. दिवसभर विद्यापीठात प्रबंधाचे काम करून संध्याकाळी घरी निघाले की संध्याकाळी हे पक्षी जणू मला भेटायचे. कधी कधी त्यांनाही आठवडी सुट्टी असावी असा एकही दिसत नसे.

इतर ऑफिसमधील बायका लगबगीने घरी निघाल्या होत्या. खूष उत्साही! ह्यांना जर नोकरी सोडा म्हटले तर? काही जणींना नोकरी हा विरंगुळा असतो, काहींना घरचे प्रश्न असतात. काहींना बदलीची भिती नसते.

माझी ही बदली हा बदला होता. कदाचित बदलीच्या गावी मी माझी भाड्याने घर घेऊन राहिले असते तर मी नोकरी सोडली नसती. सहा महिनेच नवाबागला काढून पुन्हा मुंबईला यायला संधी होतीच ना! काही जण तर अहमदाबाद, गोवा, भोपाळ कुठे कुठे गेले होते. संस्थेत त्रास होता पण बाहेर सुद्धा आहेच की!

उत्तर भारतीय व दक्षिण भारतीयांनी महाराष्ट्रीयन लोकांची ही गळचेपी केली नसती तर, जर तर ला काहीच अर्थ नसतो.

कितीही त्रास होत होता तरी ती संस्था पगार देत होती. मी सुद्धा अनेक सहनशील, विचारी निर्लज्ज, बोथट, चतुर किंवा अशा अन्य वर्गात वावरून निगरगट्टपणे पाय रोवून राहणाऱ्यांमध्ये राहू शकत होते. दोषारोप करून उपयोग नाही.

तो दरवाजा बंद झाला आहे.

Some decisions cause more damages.

रागाच्या भरात आत्महत्या केली तरीही जीव तर गेलेलाच असतो. त्यावेळी पुनर्जन्माचाच विचार करावा लागतो पण हा जन्म संपतोच.

गतं न सोच्यम!

एक सुंदर पक्षी त्या माझ्या क्लासच्या खिडकीत येऊन उड्या मारत असे. शीळ घालत असे. एक दिवस त्याने इतरांची दया येऊन इतर पक्ष्यांना आपले घरटे असलेले झाड दाखवले. एकटेपणामुळे, सौजन्याने त्या पक्षाने, त्या इतरांनाही स्वीकारले. चंडोल, लालबुड्या, मधचोख्या, चुबुकडुबुक अनेक पक्षी पाठोपाठ आले.

काही दिवस बागडण्यात गेले. नंतर ती पक्ष्यांची झुंड याच पक्ष्याला चोचा मारू लागली. हिरव्यागार रंगाचा लाल डोळे असलेला तो पक्षी डोक्यावरचा तुरा पाडून मलूल बसू लागला. एक काळाच पण पाठीवर चार पांढरे पट्टे असलेला अजून एक पक्षी त्या झाडावर आला. त्या पक्ष्याने या पक्ष्याला चोच उघडून टोच मारली. हा पक्षी केविलवाणा झाला. त्याची पिसे गळाली, त्याच्या पायाला जखम झाली.

सुंदर पक्ष्याची दुर्दशा झाली. कस्तुरी पक्षीण नामशेष झाली. झाशीची राणी कमकुवत बाई, बिनताकतीची बाई झाली. पक्षी जर तारेत अडकले तर त्यांना सोडवायला मी जाऊ लागले. महाराष्ट्राचा राज्यपक्षी पिवळ्या पायाचे हिरवे कबूतर पाळले.

कधी संध्याकाळी मावळतीच्या उन्हात गार झुळूक आली की, नवागावची शाखा तिथला जुळा पिंपळ आठवतो. त्या पिंपळावर कलकलाट करणारी कोकिळा आठवते. आमच्या समोर त्या शाखेत मुक्त संचार करणारा ८ फुटी नाग, छोटी धामण आठवते. कधी पावसात आत शिरणारे पाण साप, विंचूही आठवतात. संस्थेतील ठाण्याच्या विषारी लोकांपेक्षा या जनावरांमध्ये कमी विष होते. कस्तुरीपक्षी म्हणून लोकवस्तीपासून व इतरांपासून दूर राहात असेल. ठाण्याच्या लोकांना माझा छळ करायची पुढची संधी मिळाली. माझे ग्रॅच्युईटीचे पेपर्स त्यांच्याजवळ मी दिले. शिपाई घेऊन जाईल, तुमच्याजवळ देता येत नाही, असे त्यांनी सांगितले. जणू काही मी खूप मोठा फ्रॉड केला असावा अशा स्टाइलमध्ये माझी ग्रॅच्युइटी अडवली. ''कागद कदम नावाच्या शिपायाने पैकरच्या सल्ल्याने समुद्रात फेकले.'' पोनी मला फोनवर म्हणाली. तिला आतमध्ये आनंदच झाला.

माझा पुन्हा तळतळाट, चिडचिड, हेलपाटे

मला कोणतीही गोष्ट सहजपणे मिळू 'न' देणे हा एकमेव हेतू होता. दुसरे कागद बनवून दिले तर श्रीधर सहकार्य करेना. पेन्शन वाले माझ्याजवळ sanction ची प्रत देईनात. कदाचित पैकरने कसे दमदाटी करून थांबवून सही घेण्याचे बेत केले होते, तसे पुन्हा होते की काय? माझ्या नंतर ज्यांनी अर्ज दिले, त्यांचेही पैसे दिले, माझे देईना. मला सर्वजण-सर्वजणी पोलीसकेस कर असे सांगू लागल्या. मी पुन्हा निराश झाले.

खजिना हृदयात आहे. पण म्हणून मी माझी पेन्शन, माझी ग्रॅच्युइटी माझ्या कष्टाची आहे ती कमाई सुद्धा वाटेल त्या उशिराने मिळते हे सहन करायचे?

७ तारीखला मी रिटायर झाले. १५ दिवसात ग्रॅच्युइटी मिळायला हवी पण ? मुद्दाम कागदपत्रच कमी पाठवणे, हरवणे हे शस्त्र ही लोक कायमच वापरतात. प्राय म्हणाला २६ तारीखला चौकशी करा सांगितले आहे. त्यामुळे मी इतरांचा वेळ वाया घालवला नव्हता, पण तो कदम पैकरचा माणूस होता. कागद समुद्रात फेकले. नवल म्हणजे वरिष्ठ माझ्याशी खोटे बोलले की २७ तारीखला फोन करायला सांगितले आहे.

मी करोडपती नव्हते.

खरे तर नाखुषीने छळ असह्य झाला म्हणून निवृत्ती घेतली. पण त्याचा अर्थ माझा आर्थिक तोटा करावा असा नाही. बरे झाले, मी प्रायवर विश्वास न ठेवता नवऱ्याला त्या ऑफिसला पाठवला. माझे पेन्शनचे कागद गहाळ केले गेले होते.

पण तो आहे

देव कुणी पाहिला ? देवाचे घर कुठे आहे ? कसे आहे ? कुणीही उत्तर देवू शकत नाही. पण तो आहे. देव ही एक मनाची आवश्यकता असते, कारण त्याच त्या कल्पनेवर माणसाची आशा घडते. कुणावर तरी सर्व सोपवून निर्धास्त राहण्याची आपली गरज ''देव'' ही कल्पना पूर्ण करते. आपल्या अपयशाचे खापर फोडायला व आधाराचा हात मागायला मनाने निर्माण केलेले एक बुजगावणे म्हणजे 'देव' असावा असे काही शास्त्रज्ञ म्हणतात. अतिंद्रिय शक्तिवर अवलंबून राहणे तसे घातकच असते. परमेश्वराचे त्या ऐश्वर्याचे मृगजळ हे मानवी प्रगतीला घातक सुद्धा ठरू शकते. जीवनातील प्रश्ना मानवाने सोडवायचे असतात. ते कधी तरी सुटतील म्हणून देवावर सोडायचे नसतात, प्रयत्न करायचे असता. देव कल्पनेत असतो. श्रद्धा व अंधश्रद्धांमधील फरक जाणायचा

असतो. अनादि काळात वेद होते, नंतर देव आले नंतर प्रत्येकाचे आदर्श बदलत गेले, प्रमाणे बदलली. ''परमेश्वराला रिटायर्ड करा'' अशी एक नास्तिक चळवळ मध्यंतरी सुरू झाली होती. त्यामागे मानवाने प्रयत्न वाढवावे हीच इच्छा असावी.

कित्येक वेळा आपल्याला सुद्धा वाटले की, ''Sucess is a chance''

सखी : भारतीय संस्कृती मधील अनेक कल्पनांमध्ये देवाची तोंडओळख येते व या ओळखीतून पुढे सर्व काही त्या देवावर सोपवायचे ही संकल्पना जन्म घेते. परमेस्वर या कल्पनेच्या चौरंगावर मग श्रद्धेचे निरंजन, फुलवात पेटते. देव देवळांमध्ये, मूर्तीमध्ये असतो का? माणसाच्या मनामधील देवाचे काय? व्रतवैकल्यांना जरूर फळ येते हे संशोधनाने सिद्ध झाले आहे. अर्थात् याचे कारण तीव्र इच्छाशक्ती हे असू शकते. आत्मक्लेशातून परमेश्वराच्या अधिक जवळ जाता येते.

When you decide to to something

The world conspire to help you

मी : ''देवाचिया दारी उभा क्षणभरी'' म्हणून सुद्धा किती बरे वाटते. देव अजून कुणी पाहीला नाही हे खरे असले तरी देव अनुभवला तरी आहे. देव देवळात नाही म्हणतो मात्र देव कुठेतरी आहे हे नक्की असते. कष्ट करणाऱ्या व्यक्तिंजवळ देव असतो. मानवता व सद्भावनांमध्ये ही तो आढळतो. देव सत्य आहे की कल्पना आहे सांगता येत नाही. पण तो आहे. तो माझ्याबाबत न्याय करणार आहे.

सखी : स्वेद गंगेच्या तीरी,

जिथे नांदती हात तेथे हरी

परमेश्वर आहे!

जाणारा ऋतू आणि...

जाणारा साहेब जसा एक ठसा सोडून जातो तसा नव्या साहेबांचा रंग नवा असतो. जाणारा ऋतू नेहमीच एक वेगळा रंग मनावर सोडून जातो. ऋतू बदलणार हे तर सत्यच असते. पण ह्या साहेबांच्या बदलानंतर काही फरक पडतो का सत्य तेच राहते. कारण बाकी गळके नळ, स्टाफ तोच राहतो. मागे उरलेले रंग.

तसे पाहता प्रेमाचा गारवा, प्रत्येकच ऋतूत असायला हरकत नाही. पण सुन्यासुन्या वाटेवर वैशाख वणवा जास्ती चटके देतो. एकच रस्ता पण दोन ऋतूत वेगळा वाटतो. एकच माणूस वेगवेगळ्या प्रसंगी वेगळे वागते.एकच माणूस माझ्याशी वेगळा वागे, त्याच्या मैत्रीणीशी वेगळाच वागे.

समुद्र लाटावरी येतील हा मन मोहावया

खळखळपणाच्या नादासंगे बेधुंद करावया

ना कुणाची तमा ना रुसवा फुगवा

ना तुझा न माझा असा किनारा हवा

कस्तुरी पक्ष्याबद्दल अभ्यास करायला एक मोठे पुस्तक आणले पण थिअरीवरून काही नीट कळेना. मी तीन वेळा नेहमीच स्वतःसाठी राखल्या. त्या भल्या पहाटे, दुपारी २ ते ३ व रात्री १२ ते १. मी बरेच काही लिहायची. मात्र ते योग्य आहे की नाही हे न समजून फाडून टाकायची. स्वतः जगायचे? पण ते दुसऱ्याला मारून? दुसऱ्याचा बळी घेऊन? मी कधी सामीष जेवण पण जेवले नाही. पण माझा बळी घेऊन इतर मिटक्या मारत होते. बघा, चार आण्याची लायकी नसलेले राहतात. पदोन्नती घेताना व पगार खात वर्षानुवर्षे राहतात. मी इतकी कामात प्रविण पण अपयशी झाले. जगण्यासाठी ज्ञान, कला गुण नकोत तर काम कसे टाळावे हा अवगुण हवा! अहो काम टाळणे, गोड बोलणे व तरीही खूप काम करतो असा अभिनय करणे म्हणजे यशस्वी होण्याची त्रिसूत्री असते.

काम कशाला करता? मीच होते मूर्ख का? रोज ऑफिसचे काम सुद्धा घरी नेवून करायचे. सहन झाले नाही की मनात म्हणायचे

पाव दत्ता पाव, पाव मला आता

या क्षणी येऊन शांत करी चित्ता

या कामाच्या जागेवरच्या ताणाने किती बळी घेतले असतील? की मीच? Why me?

मन आवरले. त्याच दिवशी मला एका वृत्तपत्रात बोलावले होते. ''तुम्ही DTP/Marathi Typing शिका''

– संपादक

‘‘आता पत्राने पोस्टाने पाठवणे ही जुनी कल्पना आहे. Online पाठवा’’ - उपसंपादक

मी मान हलवली. तब्येतीचे प्रश्न विचारात घेता मला आता ते शिकणे कितपत जमेल ?

चार जण माझी मुलाखत घ्यायला होते. मी हुषार होते पण संस्थेने ग्रॅच्युइटीसाठी केलेली अडवणूक, छळ, फोन, त्रास यामुळे माझे त्या लिखाणात लक्ष लागेना. मी जो क्लास लावला होता त्याच त्या क्लासमध्येही माझे मन लागेना. एका ठिकाणी मी वाचले की कस्तुरी पक्षी हळवा असतो व दुःख सहन न झाल्यास जमिनीत चोच व डोके खूपसून मरून जातो, आत्महत्याच (एक प्रकारची) करतो. मी सुरुवातीला निवृत्त झाल्यावर जो रंगीबेरंगी पक्षी निळाकोट घातलेला ससा Alice in the wordland मध्ये आमंत्रण देऊन बोलावत असे तसा आता बोलावेना. मला काम सुचेना आणि पुन्हा पुन्हा मनात अपमान, त्रास, क्रूर चेहऱ्याचे ठाणे संस्थेचे लोक आठवत असत. कस्तुरी पक्षी जसा दुर्मिळ झाला तशा लढाऊ स्त्रिया या भारत देशातून नष्ट होतील का? रात्रीसुद्धा घाम येऊन मी माझे पेन्शन अडवतील ह्या भितीने जागी होऊ लागले. कस्तुरी पक्षाने माझी नोकरी सोडवली, वर पेन्शन तर जाणार नाही ना!

मी वरिष्ठांकडे तक्रार करायचे ठरवले. वरिष्ठ ठाण्याला ११ वाजता येणार होते. ते येणार म्हणून नाचणाऱ्यांना माझी पेन्शन सोडायची घाई नव्हती पण वरिष्ठ सुद्धा त्यांच्याच चक्रातील

असणार? माझ्या एका गुरु मैत्रिणीने सांगितले, तू पोलीसात तक्रार करूनच ठेव नाही तर तुला वरिष्ठांना भेटण्यापूर्वीच गाडीने उडवतील आणि अपघात झाला असे दाखवतील. मला दोन्हीही प्रकारे धाडस करायचे नव्हते.

अक्षय तृतीयेला मला खूप सुंदर असा लेख छापून वर्तमानपत्राने उपकृत केले. माझा जगातल्या चांगुलपणावरचा विश्वास थोडा वाढला. पैसा वाईट असतो, विशेषतः जेव्हा कष्टाचा पैसा कुणी आपल्यावर अन्याय करून आपल्याकडून हिसकावून घेतो तेव्हा! पैकरला स्वतःला वरच्या कमाईचा मोह सुटत नसे आणि माझी स्वकष्टाची ग्रॅच्युइटी मात्र तो दाबू इच्छित होता. या जगात शोषणकर्ते हे नेहमीच स्त्रियांच्याच मागे लागतात.

मी पक्षी निरीक्षणाला वाहून घेतले. नवरासुद्धा सोबत येई.

डॉ. सलीम अलींसारखा पक्षीमित्र ज्यांच्या चित्राबद्दल अमरकथा बनवली जाते असा एखादाच असतो. मात्र पक्षी आपले मित्रच असतात. तो पक्षी तारेवर बसून किलकारी मारत असे.

घरासमोर पूर्वी एक छान टुमदार बंगला होता, तो तोडला आणि तिथली उंच ताडीची, दोन आंब्याची झाडे तोडली. त्यामुळे तिथे राहणारे पक्षी विस्थापित झाले होते. कदाचित त्याच पक्ष्यांकडे कुणी पाहुणा असावा किंवा मुंबईत जसे परप्रांतीय लोंढे पोटासाठी येतात तसा तो आला असेल. दुष्काळामुळे त्याचा जलाशय सुकला असेल. आपण नावांवरून गाव ओळखतो, पक्ष्यांना त्यांचे गाव कसे ओळखता येत असेल?

जवळजवळ तीन तास तो त्या तारेवर मान हलवून हलवून किलकाऱ्या देत होता. दहा वाजता दुसरा एक साधारण त्याच्याच जातकुळीचा पक्षी आला. पिवळी चोच, पांढरा एक ठिबका, लाल मान, निळपंख, काळी शेपुट होती. दोघे पक्षी उंच उडाले. तू एखाद्या ठिकाणी थांब, मी तिथे येतो, नंतर जाऊ'' असे म्हणावे असे. ते दोघे पक्षी उडून उत्तर दिशेला गेले, तिकडे येऊरची टेकडी आहे. संध्याकाळी मी ते पक्षी परत येतील म्हणून बघत होते पण दिसले नाही, कदाचित चांगले घरटे मिळाले असेल.

मला एका वेळी सर्व कामे करून गोंधळ घालायची, मला सवय झाली होती. खरेतर एका वेळी एकच घास घेत वावरायला हवे होते. दमछाक झाली नसती. पक्षी निरीक्षणाचा सुद्धा एक अभ्यासक्रम असतो. वेळ मिळाला की तो करू लागले.

पक्षी, नद्या, हवा, झाडे यांना कोणतीही जात पात धर्माचीं बंधने अडवत नाहीत. माणसांनीच भिंती बांधल्या. निसर्ग ठेवेल तसेच पक्षी राहतात, कपारीत झाडांवरच्या छोट्या ढोल्यांत, घरट्यांत माणूसच तोडफोड करून समुद्र, नद्या, नाले बुजवून भराव घालून जमिनी हडपून गृहनिर्माण संकुल बांधले आणि पक्ष्यांची प्राण्यांची झाडांची बिल्कुल पर्वा करीत नाही. मी जंगलांत नाही त्या ठिकाणी सुद्धा फिरुन पक्षी शोधू लागले. जंगल यात्रा करू लागले. व. पु. काळ्यांच्या पार्टनरसारखी एक मैत्रिण भेटली. मुक्या प्राण्यांना, पक्ष्यांना सुद्धा जीवनात रस असतो, शत्रू असतात मित्र असतात. त्यांनाही जगण्यासाठी धडपड करावीच लागते. पोटासाठी कष्ट मलाही करायलाच हवे. तिने मला नाव सांगितले नाही. मीच तिचे ही नाव ठेवले, सखी!

''रानवारा छान वाटतो'' – मी

‘‘एसीमुळे लोकांना शुद्ध हवा नको, चित्रपटांपुढे त्यांना खरा निसर्ग नको’’– सखी

‘‘अध्यात्माची फॅशन आली आहे ना’’ – मी

‘‘आधी आत काही असेल तर आध्यात्माचा उपयोग. नाही तर तो सुद्धा टाईमपास’’ – सखी

पक्ष्यांची शाळा

पाऊस वाढला. रेशीमधारा, पाऊसरेषा कोसळायला लागल्या आणि ती पक्ष्यांची शाळा सुटली. भराभर उडत ओले पंख फडफडवत ते पक्षी आकाशात उडाले. थोड्याच वेळात ती टेलिफोनची वायर, जिच्यावर वर्ग भरला होता, रिकामी झाली. रिटर्न तिकीट काढलेले ते पक्षी थोड्याच वेळाने पाऊस उघडताच पुन्हा त्या पक्ष्यांच्या शाळा वर्गात आले. हिरव्या झाडांवर पांढऱ्या बगळ्यांची ती पक्ष्यांच्या टिपक्या टिपक्यांची रांगोळी! आकाशाच्या निळ्या घुमटावरसुद्धा हे पांढरे बगळे शोभून दिसतात.

टेलिफोन वायरवर बसणारे कावळे, टिटव्या, चिमण्या, साळुंक्या, पाखे, खंड्या पक्षी, बुलबुल हे सर्व जण एका विशिष्ट प्रकारच्या पॅटर्नने एका जागी जमतात. त्यांच्या त्या जमण्याला एका वारंवारिता असते. एक ताल असतो. पिंजऱ्यात अडकवले जाणारे पक्षीसुद्धा ठराविक प्रकारे वागतात. काळाच्या आदि व अंत नियमानुसार ही शाळासुद्धा भरताना सर्वजण त्या झाडावर किंवा जलाशयाकाठी जमतात. संकट काळी, पाऊस पडल्यावर, घरटे तुटल्यावर ते समूहाने जमतात. कालचक्रानुसार लयबद्धपणे तोच तो थवा त्या जागी जमतो. पक्ष्यांचे समुह अनेक

महीने प्रवास करून त्याच त्या जलाशयापाशी जमतो. उदा. शिवडी येथे येणारे सायबेरीयन क्रेन, माळशेज घाटातील फ्लेमिंगो, ठराविक वेळी येणारा भारद्वाज यावरून असे जाणवते की पक्ष्यांमध्ये सुद्धा काळ, वेळ, स्थळ याची जाण व ओढसुद्धा असावी. पंख पसरून किलबिलाट करुन ते बोलतात. हजारो वर्षांपूर्वी संदेशवहनासाठी कबुतर या पक्ष्यांचा उपयोग केला जाई. त्यावरून कबूतरे काळ, स्थळ व व्यक्तींना सुद्धा ओळखतात. त्याच त्या झाडावर पुन्हा पुन्हा घरटे बांधणारे पक्षी. घरट्यातील अंडी खायला दुसरा पक्षी किंवा साप आल्यावर त्याच्यावर हल्ला करणारे पक्षी बघता, पक्ष्यांना कोणत्या तरी शाळेत शिक्षण नक्कीच मिळत असावे. डॉ. सलीम अली हे पक्षी निरीक्षण तज्ञ ज्या जागी अभ्यास करीत असत ती जागा माझ्या वस्तीपासून खूपच जवळ आहे. जणू त्यांनीच मला पक्षी हा विषय दिला.

एक विषय द्या मला

मी खुलवेन ती कथा

मी जाणेन त्या भावना

मांडेन माझी संवेदना

पक्ष्यांचे प्रेम मानवाला नेहमीच वाटते. खरे तर नक्की कोणता आहे या पक्ष्यांचा चेहरा? त्यांच्या शाळेबद्दल संशोधन व्हायला हवे. तोपर्यंत आपण पक्ष्यांच्या थव्यांना निरर्थक पोटार्थीच, उडाणटप्पू मानणार! उडणारे, दाणे टिपणारे खिजगणतीत नसलेले शाळेत न जाणारे

एखाद्या दिवशी पक्षीच दिसत नसत. त्यांना पण कामाचे दिवस, सुट्टी असेल का? Working hours, त्यांच्यात पार्टी, शाळा असेल का?

मी कस्तुरीपक्षी मित्र संघटना स्थापन केली.

कस्तुरी पक्ष्याच्या १/३ जाती नष्ट होण्याच्या मार्गावर आहेत. १० वर्षातील जंगलतोड, करवतीचा आवाज यामुळे ६० वर्षात तो नष्टत्वाच्या मार्गावर आला आहे.

चॅटरींग ग्लोरी, रेन फॉरेस्ट पॅरट या नावाने इंडोनेशियातील हलमोहरा समुद्राजवळील बेटावर आढळतात. पोपटाप्रमाणेच दिसणारे हे पक्षी बोलण्यात चतुर असतात. त्यांनी अधिक आकर्षक बोलावे म्हणून अधिक काळ पिंजऱ्यात ठेऊन त्यांना प्रशिक्षण देण्याच्या प्रयत्नांत अनेक पक्षी मरण पावतात. पिंजऱ्यात बॅगांत, प्लास्टिकच्या बाटल्यांमध्येही हे पक्षी अन्य देशात विक्रीसाठी पाठवले जातात व त्या दरम्यान मरण पावतात. १९७९ पर्यंत हे पक्षी दिसत तरी, नंतर तेही कमी झाले. सोन्याच्या खाणीजवळ पांढरी कोकिळा व कस्तुरीपक्षी हमखास दिसतात.

हा पक्षी जगला तरच त्याची विक्री व व्यापार सुरळीत राहील, ह्या बाबत जनजागृती व्हायला हवी. इंडोनेशियात न्यु गिनी येथे टेकड्या व डोंगरावरच्या मोठ्या झाडांच्या ढोलीत हे पक्षी घरटे बांधतात. त्यांचे आयुष्य २० ते ४० वर्षे असते व मध, मका कणसे, छोटी फळे दिल्यास अधिक गोड शीळ घालतात. ४० वर्षे या पक्ष्याला पिंजऱ्यात गुलाम बनवतात. खरे तर त्याला पाळणाऱ्याला ४० वर्षे मालक जसे शिकवेल जसे बोलण्याची सेवा या पक्ष्यांपासून मिळते. कस्तुरी पक्षी मित्र संघटना बांधणीचे काम चालू आहे व राहणार आहे.

पक्ष्यांबरोबर मी स्वतःचा शोध घेत फिरत होते, उडत होते, तहानलेली होत होते. एका नाटकात काम करायची संधी आली. तांदूळ निवडता निवडता, कंदिल पेटवतांना, भाकरी भाजताना अशा नावाच्या नाटकातच मी काम करू शकते अशा वयात आहे. स्ट्रगलर्सचे सुरुवातीचे दिवस जसे भयानक व हताश करणारे असतात तसेच हेही दिवस होते.

''फोटोसेशन करावे लागेल ?''

माझ्या मनात आहे ३१ वर्षे जिथे काम केले त्या Corporate sector मध्ये सुद्धा मी सुरक्षित नव्हते. मग आता इथे ? कुणी गैरफायदा घेतला तर ? समाजात स्त्री ही फक्त 'त्या'साठीच असते असा गैरसमज बाळगणारे असतात व त्यांच्याकडे संधी गेली, सत्ता गेली की त्यांचे पैकर होतात. हवा डोक्यात जाते. मी एका अंधशाळेत मुलांना मोफत शिकवायला जावू लागले. चांगल्या माणसांच्या चांगूलपणाचे सुद्धा एक चक्र असते ते चालू ठेवावेच लागते. बाकी माझ्याशी कोण किती वाईट वागले ते विसरून मी या समाजकार्यात वाहून घेतले.

कुठेतरी पहात असेल तो माझी वाट

ज्याच्या इच्छेने होते माझी पहाट

कधीतरी जवळ यावे

मजला मिठीत घ्यावे

डोळ्यामध्ये डोळे घालून

निर्वाण मला प्राप्त व्हावे।।१।।

देवाजीच्या दारी आले

त्याची दया हवी म्हणाले

झोळी रिकामी राहील का ?

सांगा त्या नियंत्यापुढे।।२।।

चांगुलपणाची पण एक साखळी असते, ती चालू ठेवावीच लागते. देव ती चालू ठेवतो. जग चालते ते त्या काही चांगल्यांच्या भरवशावरच! एक तारखेला मुलाला २००० पौंड पाठवायचे होते. माझा पगार या महिन्यापासून बंद झाला होता. पैकरने माझे पोट मारले. माझ्या पोटावर पाय दिला होता, मी लढायला हवे होते, मी लढू शकत होते. पण माझे मन खचले. म्हातारीही मेली होती. अर्धीच राहिली माझी गोष्ट. पोट मारले माझे. स्पष्ट काळही सोकावत होता. मी निर्लज्ज झाले असते तर ते माझे काय बिघडवू शकत होते, असेही कामचोरांचे राज्य फोफावत होते. त्यांच्या बाबत तर कोणीही काही कृती करत नव्हते. शतक वर्षाच्या निमित्ताने खूप खर्च, खूप जाहिरात चालू होती. माझी संस्था शिबीरे झाली. व्याख्याने झाली, भजने झाली. पण काही केल्या मन रमेना.

एखाद्या दिवशी फोनच वाजला नाही की वाटे सगळे आपल्याला विसरले. संगणकाचा माऊस पकडू न शकणारे त्या संस्थेत उच्च पदस्थ होते. आपण मात्र भितीने त्या संस्थेबाहेर पडलो. कदाचित उच्चपदस्थ होण्यासाठी माऊस पकडता न येताही कशाला न घाबरणे व टिकून राहणे हे गुण आवश्यक असावेत.

मी दुखावले गेले पण मी देवाला एक विनंती केली, ''त्यांच्याकडे मी दुर्लक्ष केले. kill with neglect अनुल्लेखाने मारीन पण मला खूप यशस्वी कर.'' पुढच्या रस्त्यावर मी फक्त प्रार्थनाच करू शकत होते. कस्तुरीपक्ष्या तुझ्यासारखी मी मातीत चोच घालून नष्ट होऊ नये असे वाटत असेल तर मला यश दे. मला त्रास देणाऱ्या सर्व मुंग्यांना, झुरळांना, किटकनाशकाने आणि अपमानाचा लहानशा वेदनांना Painkiller ने मारता येत नाही.

प्रत्येक वाईट गोष्टीत चांगली गोष्ट आणते. ती म्हणजे भविष्याबद्दलचा आशावाद! उद्या वेगळी येईल ही आशा?

मी माझ्या नव्या क्षेत्रात अभ्यासात लक्ष घातले.

वपुंच्या पार्टनर सारखी तू मला सखी वाटतेस – मी

तू अकाली जाऊ नये म्हणून मी तुला पक्षी अभयारण्यात आणते – सखी

२० वर्षांपूर्वी कर्नाळ्याला रात्री भिती वाटावी एवढे जंगल व अंधार होता.

संस्थेत जाणे बंद झाले. 'लढ झगड़ आगे बढ़' काही काळ थांबले होते. निदान मी माझ्या मनाशी, सखीशी संवाद साधू शकत होते.

एका डोंगरावर पक्षी बघायला जात असे. पक्ष्यांसाठी दगडी रांजणात पाणी ठेवत असे. कारंजे व झाडी लावली. बाहेर माणसांना पाणी पिण्यासाठी माठ भरून ठेवला. घरटी वाऱ्यावर

मोडून पडलेली बघितली जणू झोपड्या तोडल्यावर हताश होणारे लोक असे पक्षीसुद्धा हताश झालेले दिसतात.

जे आवडते ते कर म्हणून कस्तुरी पक्षाचा शोध मी पुन्हा सुरू केला आहे. मागेसुद्धा काही अनपेक्षित कारणांनी संशोधन बंद करावे लागले आता काय होईल ?

प्रत्येक झाड हे वैयक्तिक विद्यापीठ – ज्ञानद असते. झाडाभोवती बांधलेला कट्टा, झाडाच्या आधारावर, मोकळेपणे बोलावे म्हणून असतो. न बोलता मौनाने शिकवते ते झाड इतरांना बोलके करते. जेव्हा अंधारात सोबतची व्यक्ती दिसली नाही की भय वाटते. मात्र त्यावेळीही ते असतातच. प्रकाशात सोबत दिसते. मनाचा प्रकाश दीसू लागला की रान टेकडी .... तरीही मग त्या प्रकाशात एकटेपणा जाणवत नाही. सोबत असलेल्या व्यक्तीसुद्धा अंधारात दिसत नाहीत. विरंगुळ्याने मन रिकामे करा तरच ते भरता येईल. एखादे मन हवे रिकामे मडके चांगले त्यात सर्व भरता येते. मी विद्यार्थी झाले. नवशिक्या हा बोर्ड लाऊन मी नव्याने शिकू लागले.

वृक्षवल्लींबद्दल काही करून पाहिले. पक्षी बघण्याची आवड होतीच, पक्षी बघत फिरले.

पक्षी मित्र संघटनेत सामील झाले. एका रात्रीत थोडीच कोणी मोठ्ठे होते. कुठे तरी यश होते पण कुठे ते सापडत नव्हते. यशाचा खजिना शोधत रानीवनी फिरले. वाई, सातारा, नाशिक सर्वत्र फिरले. भयकथा या माहीत असलेल्या व नसलेल्या भुयारांच्या कथा असतात. झाडे व भुयारे सांगतात कुणी ऐकोन्ऐको बोलो, मनात बोला किंवा मोठ्याने बोला. संवाद करा. मी मोठा झालो नाही मला गप्पा माराव्या, चकाट्या पिटाव्याशा वाटल्या.

कृष्ण विवर आकाशात, समुद्र तळीत भोवरे, नदीत भोवरे, माणसाच्या मनात भुयार... ते भितीच एकाकीपण उत्पन्न करतात. भुयाराच्या पळवाटीने जीव वाचतो. पूर्वज सरपटणारे प्राणी गुहेत, भुयारात राहायचे. मन भय करी, जीव घेणी भुयारे पण हे अनुभव कधी तरी सांगायला हवे. भुयार हसणारे बोलणारे विस्मयजनकही आहे. ही मनाच्या भुयारांची भटकंती, जे मिळेल ते माझे, अज्ञान असते. शिखरावरचे झेंडे दिसतात, भुयारात जो इतिहास असतो, अंधार असतो. भटके नावाचे गृहस्थ भेटले त्यांचे अनुभव चकित करणारे होते. यशाचा शोध, खजिन्याचा शोध चालूच होता. गुप्त धन मनातच होते. मी ते बाहेर शोधत होते. मला वेश्यांबद्दल, कचरा वेचणाऱ्यांबद्दल काहीतरी करावेसे वाटत होते. ६०००० रु. महीना कमावणारी मी शोषणाला बळी पडू शकत होते तर त्यांच्यावर किती प्रसंग, अतिप्रसंग होवू शकतात.

घुबडाबद्दल एक कविता सुचली –

ते हुषार म्हातारे घुबड

बसले झाडाच्या ढोलीत ।।धृ।।

टुकटुक बघे नजरेने

बोले न काही बोलीत

कमी बोले जास्ती बघे

चतुरपणे निरखीत ।।१।।

घुबडाकडूनही शिकू या

कमी बोलून जास्ती लिहू या ।।

घुबड लक्ष्मीचे वाहन आहे, पण आपण त्याला अशुभ मानतो. एखाद्या रागावलेल्या म्हाताऱ्यासारखा चेहरा असलेले घुबड प्राणी व पक्षी या दोन्हीच्या मधलेच वाटते म्हणून अशुभ म्हणतात. मग कस्तुरी पक्षी तर इतके सुंदर, त्यांचे बोल शिट्टी वाजवल्यासारखे असतात. धनाचा रस्ता दाखवतात. गुप्त खजिन्याचा मार्ग सांगतात. तरीही त्यांना अशुभ का मानतात? पक्षी प्राणी शुभ-अशुभ कधीच नसतात. तो भाव मनात असतो.

कौरव शंभर होते व द्रौपदी एकच होती आणि पांडव समाजात आहेत कुठे? या सर्व स्तरांवर लढत लढत मी खचत होते. कुठलेही काम टाळायचे कसे यात TRO हुषार होते. T-timpasses R-Rude O-Occulate सर्व प्रकारे माझे पैसे बुडवून त्रास देवून त्यांनी माझ्या रक्ताचे थेंब प्याले. देवी रक्तबीजा बहुतेक कोपली होती.

आता जगायचे असे —

माझे किती क्षण राहीले

माझ्या धुळीचे शेवटी

येथे किती कण राहीले

हृदयात विझाला चंद्रमा

नयनी न उरल्या तारका

हे आपुलेपण राहीले

संस्थेबद्दल रोष नव्हता पण ही मागून आलेली माणसे आणि सडलेले विचार घेऊन प्रमोशनसाठी पैशासाठी धावणारे बुद्धीहीन, यांनी माझ्यासारख्या अनेकांचा बळी घेतला. एक दिवस ती संस्था बंद झाली तर? तसे होऊ नये. अंतर्नाद की अंतर्द्वंद

ह्या कविता की अश्रू सरिता?

मी कवि की मी जोगीण

तरीही चालत रहायचे

रस्ता नसलेल्या रानामध्ये

हरवलेल्या किरकोळांच्या शोधामध्ये

ही शोभा यात्रा शोधयात्रा?

की फक्त एकच पदयात्रा

एकाकी मनाची संवेदना

की झुंडीत होणारी अवहेलना?

मदतीचा हात हवा आहे

पण मजबूरी दिसणे नको आहे

ह्या संस्थेच्या बुडण्यापूर्वी

माझे टायटॅनिक न व्हावे

काय करावे मी विचार करीत होते? की अविचारी होते? पंख मिटून घेऊ का? पेन्शन हवे आहे पण मिळणार कधी? Yes I am weak. I Quit मात्र दरवाजावर कुणीतरी थाप मारत होते. महाराष्ट्र पक्षी मित्र ॲकॅडमीचा महापीठ पुरस्कार मला मिळाला म्हणून नवरा अभिनंदनाचा मेल हातात घेऊन माझ्यापुढे उभा राहीला. दिवसभर अभिनंदनाचे फोन येत होते, मी नवी झाले होते. नवशिक्याचे लेबल लावत मी आनंदी झाले.

मसाला चित्रपटाप्रमाणे एक रस्त्यावरचा साडी विकणारा मोठ्या फॅक्टरीचा मालक होऊ शकतो, तशी मी ही एक मोठी पक्षी मैत्रिण संशोधक झाले. एक खूप छान आशा व शुभसंदेश मी देऊ इच्छिते.

कोई भी इन्सान छोटा नहीं होता
कोई भी चुनौती बड़ी नहीं होती
इज्जत आबरु की इस लड़ाई में
कोई भी झाशी की रानी नाकाम नहीं होती
शहीद जरुर होती है

पर दुनिया उसे के आगे झुकती है!

फसवणारे जगात सर्वत्रच असतात. पण चांगल्या लोकांनी जग चालते. मेहनत करीत मी पुढे जात राहीले.

माझ्यावर सुद्धा No one killed Jesika ची वेळ आली होती. दूरदर्शनवर २००६ साला पासून हरी साडूची जाहिरात लागते. लोक वाईट मालकामुळे नोकरी सोडतात. संस्था नाही. मी मात्र ही संस्था सोडली. वाईट बॉस मजेत राहीला. वेगळ्या क्षेत्रात मात्र मी स्वतः यशस्वी झाले होते. माझे नाणे खणखणीत आहे हे सिद्ध केले. अन्यायाबद्दल न बोलणाऱ्यांना समजूतदार म्हणतात, पण बोलणारे इतिहास घडवतात. जे घडले तो अपघात होता. इतरांच्या चूकीमुळे मी जखमी झाले. पण अंधारावर मात करण्यासाठी यशस्वी झाले. कुठलाही पक्षी अशुभ नसतो. या संरक्षित व नष्ट व्हायच्या मार्गावर असलेल्या पक्ष्यांना कुणी मारू नये. त्यांची प्रजाती चालू रहावी म्हणून शुभ-अशुभ असे होरे या पक्ष्यांना लागले. माझा कस्तुरीपक्षी या विषयावरचा अभ्यास अजून चालूच आहे. कस्तुरी राणी पक्षी बघायला इंडोनेशियाला जायचे आहे. मी कस्तुरी पक्ष्यांना सांगते, हे पक्षिणी हरली नाही तुझी हिम्मत, जशी अजून तुझा आदर्श घेऊन मी यशश्वी होईन. ती कस्तुरीपक्ष्यांची जोडी व मी तिसरी कस्तुरी पक्षीण आमची तिघांची वाटचाल चालू आहे.

कस्तुरी, सध्या आनंदी राहण्याचा अभ्यास करणे चालू आहे.

कस्तुरी नाव तुझे चांगले

बावरे मन माझे रंगले

★★★

हे पक्षिणी हरली नाही हिम्मत तुझी जशी
आदर्श तुझा घेवून यशस्वी होईन मी तशी

# ई साहित्य प्रतिष्ठान

हिंमते मर्दा. मददे खुदा. किंवा हल्लीच्या भाषेत सांगायचं तर सच्ची लगन हो तो अपने सपने हासिल करनेके लिये सारी कायनात एक हो जाती है. मराठी भाषेत उत्तम दर्जेदार साहित्य निर्मिती व्हावी, चांगले वाचक एकत्र यावेत, त्यांना चांगल्या दर्जाचे साहित्य मिळावे आणि दर्जेदार लिहू इच्छिणाऱ्या लेखकांना असे वाचक मिळावेत. एवढेच काय ते आमचे छोटेसे स्वप्न. या आमच्या छोट्याशा स्वप्नाला लाखो वाचकांची साथ मिळत गेली आणि कारवां बनता गया.

पण आम्ही समाधानी नाही. बारा कोटींच्या या मराठी समाजात किमान एक दोन कोटी तरी समंजस, चोखंदळ वाचक असायला हवेत. ज्ञानोबा तुकोबांच्या संस्कारांत वाढलेल्या या समाजाकडून एवढी अपेक्षा ठेवायला काय हरकत आहे? मित्रहो. ज्योतीने ज्योत तेवत जावी. तसे वाचकांनीच वाचक जोडायला हवेत. तुम्हाला जर हे स्वप्न पूर्ण होण्यात हातभार लावावासा वाटत असेल तर फ़क्त एवढेच करा. आपल्या ओळखीपाळखीतल्या किमान दहावीस लोकांचे ई मेल पत्ते आम्हाला कळवा. असे ई मेल आय डी पाठवणाऱ्या वाचकांना आम्ही VIP वाचक दर्जा देतो.

आमचा पत्ता : esahity@gmail.com

अधिक माहितीसाठी भेट द्या : www.esahity.com

आपले नम्र
टीम ई साहित्य